# प्रकाशकाचे चार शब्द

क्रिकेटवरील प्रस्तुत पुस्तक वाचकाच्या हाती देताना आम्हाला फार आनंद होत आहे.

क्रिकेट हा खेळ देशी नसला, तरी त्याने हिंदी तरुणांची मने विशेष आकर्षून घेतली आहेत. हायस्कुलातील तसेच कॉलेजातील तरुण विद्यार्थ्यांना तर क्रिकेटने वेड लावल्यासारखें झाले आहे. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्रिकेटचे सामने रेडिओवरून ऐकवले जातात, त्यामुळे या खेळाला एक प्रकारची सरकारमान्यता व प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे.

अशा लोकप्रिय खेळासबंधी एखादें मार्गदर्शक पुस्तक मराठी वाचकांना उपलब्ध करून देता आले तर ती एक उपयुक्त कामगिरी बजावल्यासारखें होईल, अशी कल्पना मनात आली. त्या दृष्टीने विचार करू लागलो तेव्हा पुण्याचे प्रो दि. ब. देवधर यांचे नाव साहजिकच प्रथम डोळ्यापुढे आले. प्रो. देवधरांचा क्रिकेटविषयक अनुभव एवढा दांडगा आहे, की त्या विषयातील ते तज्ञ म्हणूनच ओळखले जातात अशा अधिकारी व्यक्तीने पुस्तक लिहून दिले, तर ते सर्वांगपरिपूर्ण होईल, या विचाराने आम्ही त्यांना तशी विनती केली आणि आनंदाची गोष्ट अशी, की आम विनती त्यांनी मान्य केली.

हे पुस्तक अभ्यासू खेळाडूंना अत्यंत उपयुक्त वाटल्यावाचून सनी नाही. पुस्तकाच्या १५ प्रकरणांतून क्रिकेटसबंधीची विविध माहिर्न या भवांच्या आधारे प्रोफेसरसाहेबांनी दिली आहे तरुण होतकरू खेहे. ज्या प्रकारचे पुस्तक अवश्य आहे, अगदी तशाच प्रकारे ते लि। प्रो. या खेळाचे वैशिष्ट्य काय, त्याने भारतात कोणती कामगिरी डूना आहे, भारतातील त्याची प्रगति कसकशी होत आहे खेळाची साधने तील त्याचा पाया कसा घालावा, क्षेत्ररक्षण, गोलंदाजी, फलंदाजी, नेतृत्व करावे, पंचाचे काम कसे निर्विवाद व्हावे, जागतिक क्रिकेटस्पर्धा, र

संस्मरणीय प्रसंग, जागतिक कीर्तीचे खेळाडू आणि त्यांची वैशिष्ट्ये—इत्यादि विविध अंगासंबंधी सुबोध ऊहापोह या पुस्तकात करण्यात आला आहे. वादविवादात्मक किंवा मतभेदाचे स्वरूप या विवेचनात कोठेहि नसून निर्भेळ माहितीने भरलेले आणि योग्य मार्गदर्शन करणारे ते आहे.

पाश्चात्य भाषांतून या विषयावर अनेक लहानमोठी पुस्तके उपलब्ध आहेत पण मराठी भाषेत, तरुणांना मार्गदर्शक अशा प्रकारचे माहितीपूर्ण सचित्र पुस्तक अद्याप तरी आढळात नाही आणि या दृष्टीने प्रस्तुत पुस्तकाचे वैशिष्ट्य नि:संशय डोळ्यात भरण्यासारखे आहे, असे म्हटल्यावाचून राहावत नाही.

सदर वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक लिहून दिल्याबद्दल आणि प्रसिद्धीच्या वेळेपर्यंत या कामी हरप्रकारे साहाय्य केल्याबद्दल प्रो. देवधर यांचे कितीहि आभार मानले तरी ते थोडेच होतील.

प्रो. देवधर यांच्या पुस्तकाला श्री. विजय मर्चंट यांच्यासारख्या नामवंत क्रिकेटपटूची छोटी प्रस्तावना पुरस्कारादाखल मिळाली, हा योगायोग तर दुधात साखर पडल्यासारखाच गोड आहे. आमच्या विनंतीला मान देऊन त्यांनी वेळात वेळ काढून हे आमचे काम मोठ्या खुषीने केल्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहो. तरुण खेळाडूंना मार्गदर्शक सूचना करून त्यांना उत्तेजन देणे श्री. मर्चंट यांना नेहमीच आवडते. त्यांचे हे प्रास्ताविक चार शब्द

श्री. विजय मर्चंट यांची

# प्र स्ता व ना

भारताने अनेक उत्कृष्ट आणि जगप्रसिद्ध क्रिकेटपटु निर्माण केले आहेत तथापि त्यांच्यापैकी फारच थोड्याजणांनी क्रिकेटच्या महान खेळासंबंधी पुस्तक लिहिण्याचा उपक्रम केलेला आहे आमच्या सर्वश्रेष्ठ क्रिकेटपटूंपैकी एक, प्रो दि ब देवधर यांनी प्रस्तुत पुस्तक लिहिले आहे तें खेळाडूकडून आस्थेनें आणि उत्कंठेनें वाचले जाईल अशी माझी खात्री आहे या खेळाविषयी अधिकारवाणीने सांगणाऱ्या व्यक्तीकडून प्रस्तुत खेळाबद्दल काही शिकावे, असे इच्छिणाऱ्यांना तर, या पुस्तकाचा फारच उपयोग होईल

अशा पुस्तकाची अत्यंत आवश्यकता आहे याबद्दल वाद नाही आणि या देशातल्या क्रिकेटच्या सर्वांत मोठ्या अभ्यासूच्या लेखणीतून जेव्हा या पुस्तकाची निर्मिति होते, तेव्हा तरुण, होतकरू व महत्त्वाकांक्षी खेळाडूंना क्रिकेट-शिक्षणाचे आवश्यक ज्ञान त्यातून मिळेल याबद्दल संशय नाही. प्रो देवधरांच्याइतकें चांगलें मराठी मला समजत नाही; तथापि क्रिकेट-बद्दल अत्यंत आस्था बाळगणाऱ्या माझ्या पत्नीनें या पुस्तकातील महत्त्वाचे भाग मला वाचून दाखविले तेव्हा मला वाटले की मी जरी पहिल्या दर्जाच्या क्रिकेट खेळातून निवृत्त झालो असलो तरी प्रो देवधरांचे ज्ञान आणि अनुभव यापासून मला बऱ्याच गोष्टी शिकता येतील

प्रो देवधरांनी या पुस्तकात खेळाडूची तत्त्वें आणि निर्व्यसनी राहणी या गोष्टींपासून तो आंतरराष्ट्रीय क्रीडांगणात क्रिकेटचे महत्त्व या विषयापर्यंत प्रस्तुत खेळाच्या सर्व अंगोपांगांचे समग्र विवेचन केले आहे

साधी राहणी आणि ठीक तव्यॆत, याच्याबरोबरच प्रो देवधरानी उत्कृष्ट क्षेत्ररक्षणावर या पुस्तकात भर दिला आहे. प्रो. देवधर हे उत्कृष्ट क्षत्ररक्षक आहेत विशेषत स्लिप्मधले क्षेत्ररक्षण हा तर त्याचा हातखंडा विषय आहे आपल्या संघाचे क्षेत्ररक्षण कार्यक्षमतेने व्हावे याबद्दल त्याचा नेहमीच कटाक्ष असतो. क्षेत्ररक्षणातील ढिलाई व झेल पकडण्यात दिरंगाई, यामुळे अनेक सामने हातचे गेल्याचे त्यानी पाहिले आहे त्यानी आपल्या वेळच्या महाराष्ट्रीय टीममध्ये, खेळाडू उत्कृष्ट क्षेत्ररक्षक बनले तरच ते संघात आपले स्थान टिकवू शकतील या मुद्द्यावर जोर दिला होता त्याचा परिणाम म्हणून गेली कित्येक वर्षे, राष्ट्रीय सामन्यात महाराष्ट्रियानी क्षेत्ररक्षणाच्या कार्यात आपली चमक दाखवली. आता प्रो देवधर हे क्रीडांगणावरून सेवानिवृत्त झालेले असले तरी, त्यानी क्षेत्ररक्षणावर जो कटाक्ष ठेवला आहे, तो आजहि फलप्रद ठरतो १९५४–५५ साली भडमडे, नाडकर्णी आणि इतर क्रिकेटपटु, क्षेत्ररक्षणाच्या बाजूवर चमक्त असलेले दिसतात गोलंदाजी आणि फलंदाजी, या बाबतीत प्रावीण्य संपादन करण्यास काही नैसर्गिक गुणाची आवश्यकता असते, पण कोणालाहि अभ्यासाने, चिकाटीने, संयमाने आणि आवश्यक निर्धाराने उत्कृष्ट क्षेत्ररक्षक बनता येईल, हें प्रो देवधरानी या पुस्तकात चांगल्या रीतीने दाखवून दिले आहे

*या उत्कृष्ट पुस्तकाच्या सर्वच अंगासंबधी या प्रस्तावनेत लिहिता* येणार नाही शेवटी मी इतकेच म्हणू शकतो की, ज्याप्रमाणे या देशातील



प्रो दि. ब देवधर, एम्. ए.

प्रकरण १ लें

# क्रिकेटचें महत्त्व व वैशिष्टय

क्रिकेटचा म्हणजे चेंडूफळीचा खेळ प्रथम कोणी, केव्हा व कसा सुरू केला असेल, हें, पहिले काव्य कोणी केले अगर पहिले चित्र कोणी रंगविले हे सांगण्याइतकेच अशक्य आहे. करमणूक करून मनोरंजन व आनंद उपभोगण्याची प्रवृत्ति ज्या वेळी मनुष्यजातीत उत्पन्न झाली त्या प्राथमिक अवस्थेंत सर्व खेळांचे मूळ शोधावे लागेल खेळाप्रमाणे सर्व कलाच्या उगमाचा इतिहास असाच लिहावा लागेल. असे असले तरी, निरनिराळ्या देशानी निरनिराळ्या खेळाना यदृच्छया हाताशी धरले व त्यात हळूहळू प्रगति केली व आपला विशिष्ट छाप त्या खेळावर उमटवला; तथापि क्रिकेटचे बीज खरे पाहिले असता इंग्लंडमध्ये प्रथम लावले गेले व

कोणत्याहि खेळाचे महत्त्व व उपयुक्तता, त्यातील व्यायाम, करमणूक कला, नियम, शिस्त व प्रथा यावर अवलबून असतात क्रिकेटचे या सर्व बाजूनी वैशिष्ट्य आहे या खेळात व्यायाम हळूहळू, क्रमाक्रमाने व प्रकृतीला मानवेल इतक्याच बेताने होत राहिल्याने, तो आबालवृद्धाना खेळता येतो कुस्ती, बॉक्सिंग, हॉकी, फूटबॉल वगैरे जहाल खेळाच्या मानाने सामान्य जनतेला क्रिकेट पुष्कळच सौम्य व पथ्यकर वाटतो शुद्ध व मोकळी हवा जितकी जास्त मिळेल तितकी जर हितकारक तर, ती क्रिकेटमध्ये जास्त मिळत असल्याने हा खेळ खेळाडूना व प्रेक्षकाना जास्त आरोग्यप्रद वाटतो इग्लडमधील उन्हाळ्यात व आपल्या हिवाळ्यात हजारो प्रेक्षक उघड्यावर बसून क्रिकेटचे सामने पाहताना, मोकळ्या, शुद्ध व आरोग्यप्रद हवेचा उपभोग घेत असतात क्रिकेटच्या चुरशीच्या सामन्यात भरपूर मनोरजन होऊ शकतें, इतके, की दोन्ही पक्ष तुल्यबल असून, जयापजयाचे पारडें सारखें खालीवर होत असल्यास प्रेक्षक देहभान विसरतात प्रत्येकाला असा सामना केव्हा तरी पाहिल्याच आठवत असेल या खेळाचे दुसरे आकर्षण म्हणजे आयुष्याप्रमाणे क्रीडागणावरहि अनपेक्षित प्रसग अनेक वेळा उद्भवतात व खेळात सारखे चढउतार होत जाऊन स्पर्धा जास्त रगत जाते क्रिकेटला "गेम ऑफ ग्लोरिअस अन्सर्टन्टी' सबोधले जाण्याचे मुख्य कारण म्हणजे या खेळात जीविताचे क्षणभगुरत्व जितके परिणाम-कारक रीतीने मनावर बिंबले जाते व अनेक धडे शिकले जातात तितके इतर खेळात जात नाहीत मोठमोठे अनुभवी व भरवशाचे खेळाडू व त्याचे सघ एकाएकी गडगडल्याचे पाहून वरिष्ठाला विनय व सयम तसेच कनिष्ठाला आशा व आत्मविश्वास वगैरे गुणाचे धडे आपोआप मिळत राहतात

खेळात सरावाने व अभ्यासाने सफाई व कुशलता जसजशी वाढत जातात त्या प्रमाणात प्रत्यक्ष खेळाडूना व प्रेक्षकाना कलेचा आनद जास्त-जास्त लाभत जातो कोणत्याहि क्षेत्रात जय-पराजयापेक्षा ते ज्या साधनानी व मार्गांनी मिळविले जातात त्याना जास्त महत्त्व आहे खेळातहि तेंच दिसेल एखादा फलदाज आडवेतिडवे, धरमसाट टोले मारून शभर धावा करील, पण त्यापेक्षा निम्म्याच का होईना जो सुबक व डौलदार मार्गांने

काढील, त्यावर प्रेक्षक जास्त खूष होतात व त्याला स्वत लाहि खेळापासून जास्त आनद व समाधान लाभने सामान्य मनुष्य पद म्हणू शकतो व त्यापासून श्रोत्याला अर्थबोधहि होतो, पण उत्तम गवयाच्या मधुर कठातून तेच पद ऐकणारास जो आनद व समाधान लाभतात, ते इतरत्र मिळू शकत नाहीत खेळातहि नेहमीच्या सामान्य हालचाली, लय अगर तालवद्ध झाल्यास त्या कलात्मक व म्हणून अत्यत प्रेक्षणीय वाटतात विलायतेत साठ वर्षांपूर्वी जाऊन, आपल्या उत्कृष्ट व कौशल्यपूर्ण फलदाजीने ज्या रणजितसिंहाने इग्रज प्रेक्षकाना मोहून टाकले त्याचे ' लेटकट ' व ' लेगग्लान्स ' हे टोले विशेष सफाईदार व प्रेक्षणीय असत अलीकडला सुप्रसिद्ध फलदाज ऑस्ट्रेलियन डॉन ब्रॅडमनने, रणजी अगर दुलीपसिंग यापेक्षा कितीतरी पट धावाची सख्या व जागतिक विक्रम प्रस्थापित केले पण तज्ञाच्या मताने ब्रॅडमनच्या धावाच्या प्रचड आकडयानी लोक जरी दिपून गेले तरी कलेच्या म्हणजे सफाई अगर सौंदर्याच्या दृष्टीने ब्रडमनचा खेळ वधीच आकर्षक दिसला नाही.

करमणूक मनोरजन व आनद हे कोणत्याहि खेळाच मुख्य साध्य असले पाहिजे नाहीतर खेळाला व्यापाराचे व धद्याचे किंवा यत्रातील ठराविक साच्याचे स्वरूप येईल व खेळ कटाळवाणा होईल बऱ्याचशा इतर मैदानी अगर मर्दानी खेळापेक्षा, क्रिकेटमध्ये शक्तीपेक्षा युक्तीला व कौशल्याला वाव असतो खेळाडू फलदाज ज्या वेळी प्रतिपक्षाला पूर्णपणे काबूत आणून आत्मविश्वासाने चेडू वाटेल त्या क्षणी व वाटेल त्या बाजूस सहज टोलावीत असतो व गवयाला जसा सूर लागून आवाज खुलतो तशी जेव्हा त्याच्या बॅटीच्या फिरकीत सफाई येते त्या वेळी खेळातील कलेचा खरा आनद त्याला व प्रेक्षकाना उपभोगता येतो त्या आनदापुढे धावाच्या सख्येची व त्यामुळे येणाऱ्या जयाची मातवरी वाटत नाही

क्रिकेटमधील नियम, शिस्त, खेळाडू वृत्ति, खेळाची व्यवस्था वगैरे सर्व महत्त्वाच्या गोष्टी कटाक्षाने पाळण्याची प्रथा क्रिकेटचे प्रथमपासून नियत्रण करणाऱ्या इग्लडमधील एम सी सी क्लबाने व त्याच्या खेळाडूनी पाडल्याने या खेळाला सभ्यतेचे स्वरूप प्राप्त झाले आहे कोणताहि लहान-

मोठा सामना नीट रीतीने पार पाडण्याला कितीतरी गोष्टी व्यवस्थित रीतीने उरकाव्या लागतात व अनेकांचे सहकार्य घ्यावे लागते क्लबाच्या सेक्रेटरीने, प्रतिपक्षाशी विचारविनिमय करून कार्यक्रम व मैदानाची व सर्व खेळाच्या साहित्याची तयारी नियमाना धरून, वेळेवर करावयाची असते. नायकाने, खेळाडू-पाहुण्याचे स्वागत करून, त्याना सामन्याची सर्व व्यवस्था, वेळापत्रक, नियम व अटी समजावून सागून, खेळ नेहमीच्या खेळाडू प्रथेला अनुसरून खेळला जाईल याची दक्षता घ्यावी लागते. पचाना खेळात न्याय-दानाचे महत्त्वाचे काम करावे लागून खेळात कौशल्यालाच वाव मिळेल व वाममार्ग व वितुष्टाला जागा राहणार नाही याबद्दल दक्षता घ्यावी लागते खेळाडूनाहि नायकाचे हुकूम व सूचना अमलात आणून, सघशक्तीने व नि स्वार्थबुद्धीने पक्षाकरिता जय मिळविण्याची कामगिरी करावयाची असते; पण ती करताना धर्मयुद्धाचे व खेळाडूपणाचे सर्व मार्ग अनुसरून स्पर्धेत कटुता निर्माण न होईल याची खबरदारी घ्यावी लागते तरुणाना भावी आयुष्यात उपयुक्त असे इतके मूल्यवान धडे क्रिकेटपासून शिकण्याची सधि लाभत असल्याने, खेळ हे नीतिशिक्षणाचे एक महत्त्वाचे अग समजले जाते क्रिकेट म्हणजे शिस्त सचोटी बक्तशीरपणा, न्याय, उदारता व समता-वृत्ति असे समीकरण असल्याने, हें क्रिकेट नव्हे, हा खेळ नव्हे, अगर ही



डॉन ब्रॅडमन    जगप्रसिद्ध ऑस्ट्रेलियन फलंदाज

जुन्या दोन हजार वर्षांपूर्वी प्रथम ग्रीसमध्ये सुरू झालेल्या व नंतर कित्येक शतके बंद पडलेल्या ऑलिंपिक सामन्याचे पुनरुज्जीवन करणाऱ्या फ्रेंच तत्त्वज्ञ क्युबर्टिनने असेच उदात्त ध्येय खेळाडूपुढे स्पष्टपणे ठेवल्याचे दिसेल. जय, लौकिक व संपत्ति वगैरे बाह्य आकर्षणात खेळाचे महत्त्व नसून, प्रयत्न प्रामाणिकपणा, बंधुभाव व सभ्यता कमावण्यावर आहे हे तरुणांनी विसरता कामा नये.

★ ★ ★

मिळून त्याच शारीरिक व मानसिक आरोग्य टिकावे व त्याची वाढ व्हावी या अंतिम हेतूने निसर्गाने उपजत बुद्धीच्या रूपाने उत्पन्न केलेली दिसतात म्हणूनच निरोगी मूल जागेपणी खेळाशिवाय राहू शकत नाही 'खेळ खेळून व्यायाम घे व आरोग्य सभाळ' असे त्याला कोणी सागावे लागत नाही व्यायाम व खेळ हे शरीराला आरोग्य व मनाला समाधान देणारे असल्याने, त्याची आवड ही उपजत बुद्धीचा अत्यंत उपयुक्त असा एक भाग म्हणून समजण्यास हरकत नाही निरोगी जीवनाला त्याची इतकी आवश्यकता आहे, की जगाचा उत्पादक निसर्ग हाच आरोग्यप्रद खेळाचा पुरस्कर्ता व शिक्षक ठरतो म्हणून व्यायामप्रद खेळ हे जीवनाचा आधार व उलट त्याचा अभाव म्हणजे जीवनाचा नाश समजता येतील

सृष्टीच्या योजनेत असा एक सर्वव्यापी नियम आढळतो की जें कार्य जीवनाला अत्यंत आवश्यक त्याची आवड जन्मत च उत्पन्न केली जाते पोषणाला अन्न पाहिजे व म्हणून त्याकरिता धडपड व श्रम घेतला पाहिजे, तो अर्थातच मुखाने कोणी घेणार नाही, म्हणून चतुर शिक्षक ज्याप्रमाणे विद्यार्थ्यांत अभ्यासाची गोडी उत्पन्न करून कार्यभाग सहज साधतो, त्याच कौशल्याने निसर्ग आवश्यक गोष्टीविषयी अत्यंत ओढ निर्माण करून सृष्टीचे नियमन सहज करीत असतो

होऊ नये ब्रिजसारखे साधे पत्त्याचे खेळ खेळताना जो आनंद वाटतो, त्याचे एक कारण म्हणजे मधूनमधून जे विजय खेळात मिळू शकतात, त्यांनी दुसऱ्यावर विजय मिळविण्याच्या आपल्या उपजत भावनेचे अगर विकाराचे समाधान होते, पण जित व जेत्यामध्ये एरवी उत्पन्न होणारी कटुता उत्पन्न होत नाही विकारांना विचाराचे स्वरूप देण्याचे, म्हणजे त्याचे उदात्तीकरण करण्याचे, व सात्त्विक आनंद पुरविण्याचे महत्कार्य, खेळ योग्य भावनेने खेळण्याने साध्य होते

तरुणांना मैदानी व मर्दानी खेळापासून शारीरिक, मानसिक व नैतिक उन्नतीला अनेक प्रकारे साहाय्य मिळते हे सांगण्याची जरुरी नाही. नेपोलियनवर विजय मिळविणाऱ्या ड्यूक ऑफ वेलिंग्टनच्या नावावर प्रचलित असलेल्या सुभाषिताने खेळाची महति जितक्या उत्तम रीतीने सांगितली आहे तितकी इतरत्र आढळत नाही " इंग्लंडने वॉटर्लूची लढाई इटनच्या क्रीडांगणावर जिंकली " हे वेलिंग्टनचे सुप्रसिद्ध वाक्य जास्त अर्थपूर्ण आहे कारण, इंग्लंडने आपल्या केवळ लष्करी लढायाच क्रीडामैदानावरील अभ्यासाने जिंकल्या असे नव्हे, तर त्यांना इतर क्षेत्रांतहि जे जय व सामर्थ्य मिळाले त्याचे श्रेय, इंग्रज युवकांना जे धडे मिळाले त्याकडे पुष्कळ अशी जाईल राष्ट्राचे सामर्थ्य व प्रगति, त्यातील नागरिकांच्या पात्रतेवर सर्वस्वी अवलंबून असतात, व असे नागरिक तयार करणे हाच शिक्षणाचा प्रधान हेतु असतो हा हेतु साधण्यास, शालेय शिक्षणाबरोबर किंवा त्याहीपेक्षा जास्त, क्रीडांगणावर मिळणाऱ्या शिक्षणाची अतिशय मदत होत असल्याने, खेळांना हल्लीच्या शिक्षणक्रमात महत्त्वाचे स्थान पाश्चात्य प्रगत देशात दिलेले आहे

तारुण्यात प्रवेश करणाऱ्या तरुण-तरुणींच्या वाढत्या सामर्थ्याला व उत्साहाला मैदानी खेळाने योग्य वळण लावता येते व सदुपयोग करून घेता येतो भर पावसाळ्यात उंच डोंगरावरील तलावातील पाण्याचा प्रवाह प्रचंड वेगाने वाढत जातो, गढूळ होतो व अनेक बंधनांचे तट मोडून सर्वनाशास प्रवृत्त होतो पण त्याच प्रवाहाला नीट मार्ग करून दिला, त्याला कालवे अगर नळ घालून दिले तर नाश टाळता येतो, एवढेच नव्हे, तर उपयुक्त अशी प्रचंड विद्युत्शक्ति निर्माण करता येते, असे आपण पाहतो तरुण पिढीच्या वाढत्या शारीरिक व मानसिक सामर्थ्याचा सदुपयोग करावयाचा

असेल व त्याचे विकारी, गढूळ व ओढाळ मन जर ताब्यात ठेवावयाचे असेल, व चांगल्या कार्याकडे लावणे असेल तर, त्याला व्यायामप्रद खेळाची वाट करुन दिली पाहिजे मुलाचे मन ताब्यात राहण्यास व नीतिमत्ता सुधारण्यास, क्रीडांगणाचा शाळेपेक्षा कितीतरी पट जास्त उपयोग होईल कारण, शाळेतील धडे व पाठ पुस्तकात राहतात व फक्त तोंडाने उच्चारले जातात; पण खेळातले प्रत्यक्ष आचरणात आणावे लागतात मैदानावर मिळणाऱ्या व्यायामाने, मेहनतीने व महत्त्वाकांक्षेने, मुले आपण होऊन शिस्त, संयम व नियम पाळतात व आरोग्यविघातक मार्ग टाळतात असा अनुभव आहे या दृष्टीने, तरुणतरुणींचे शारीरिक, मानसिक व नैतिक स्वास्थ्य सुरक्षित ठेवण्यास व्यायामप्रद खेळ हा मोठा किफायतशीर व सोपा विमा आहे

खेळाचे सामाजिक महत्त्व, अनेक जाति, पंथ, धर्म, वर्ण वगैरे भेदांनी विस्कळित झालेल्या भारतात किती आहे हे सांगण्याची जरुरी नाही. मनुष्य साम्यवाद व समता क्रीडांगणावर जितकी सहज व परिणामकारक रीतीने शिकतो व आचरणात आणतो तितकी इतरत्र शक्य असत नाही. म्हणूनच क्रिकेटसारख्या खेळांना 'लेव्हलर' म्हणजे समतासंस्थापक असा किताब बहाल केलेला आहे समता हें लोकशाहीचे मूल्य अधिष्ठान असल्याने इंग्लंडसारख्या लोकसत्ताक राष्ट्रात खेळाचा जास्त प्रसार झाला, त्याचप्रमाणे अनेक उत्तम खेळांमुळे, लोकशाहीचे धडे शिकण्यास मदत झाली असा हा अन्योन्य उपकारक संबंध आहे असे म्हणता येईल

सर्व जगात समता, ऐक्य, सलोखा व सद्भावना निर्माण होण्यास खेळाचा उपयोग करून घेण्याची कल्पना जागतिक ऑलिंपिक खेळांच्या दंगल-निर्मात्यापुढे होती व म्हणून त्यांनी खेळातील स्पर्धेला चांगल्या उदात्त कार्याला जुंपून, जगात शांतता स्थापन करण्याचे जें मोठें काम पूर्वीची 'लीग ऑफ नेशन्स' किंवा हल्लीची 'युनायटेड नेशन्स' करीत आहे, त्याचा खरा पाया घातला आहे रोग होऊन औषधाने बरा करण्यापेक्षा तो होऊ न देणेंच श्रेयस्कर, या न्यायाने ऑलिंपिक खेळाची कामगिरी जास्त मूलग्राही आहे असे म्हणता येईल. खेळासारख्या नैसर्गिक आवडीच्या प्रवृत्तींना, उदात्त व श्रेष्ठ कामास जुंपल्याचे जास्त चांगले उदाहरण क्वचितच सापडेल.

★ ★ ★

प्रतिस्पर्धी म्हणून उतरला व ही वार्षिक लढत ' तिरंगी ' होऊन ती १९१२ पर्यंत तिघातच चालू राहिली नंतर मुस्लिम खेळाडूहि तयार झाल्याने, पुढच्या वर्षापासून चार जमातीमध्ये म्हणून ' चौरंगी ' आंतरजातीय स्वरूपाचे सामने अस्तित्वात आले व हिंदी खेळाचा दर्जा सुधारून त्याचा प्रसार झपाट्याने होऊ लागला इतका की १९२६ साली येथे आलेल्या इंग्लंडच्या एम सी सी संघाबरोबर अखिल भारतीय संघाने चुरशीचा सामना दिला एवढेच नव्हे तर पहिल्या डावात पाऊणशे धावानी आघाडी मारली या सुयशाचा परिणाम म्हणजे १९२८ मध्ये भारतीय क्रिकेटचे नियंत्रण करून, त्यात उत्तेजन व शिक्षण देऊन जागतिक स्पर्धेत नीट भाग घेता यावा म्हणून अखिल भारतीय नियामक मंडळ स्थापण्यात आले व तेव्हापासूनच्या पचवीस वर्षांत आपण अनेक देशांविरुद्ध टेस्ट सामने खेळत आलेले आहोत व प्रगतीचा मार्ग हळूहळू का होईना आक्रमण करीत आहोत या कालखंडात जातीय विभागाने लढले जाणारे चौरंगी व नंतर ख्रिश्चन व ज्यू वगैरेचा अंतर्भाव झाल्याने पंचरंगी ' झालेले भारतीय सामने— जातीय भेदाला राजकीय आंदोलनाने लोकांचा विरोध होत गल्याने—१९४५ नंतर बंद पडले ही पन्नास वर्षांची सामन्याची संस्था नष्ट झाल्याने हिंदी खेळाचे बरेच नुकसान झाले व उत्साह ओसरू लागला यात शंका नाही तथापि १९३४ पासून, प्रांतीय तत्त्वावर रणजीच्या नावाने त्याचे स्मारक म्हणून प्रस्थापित केलेल्या वार्षिक सामन्यानी ही झालेली हानि थोडीफार भरून यण्यास मदत झाली, पण पूर्वीची आवड व उत्साह मुंबई प्रांतात तरी दिसून आला नाही व खेळाच्या लोकप्रियतेस अलीकडे उतरती कळा लागली असावी असे भय वाटू लागले आहे गेल्या महायुद्धामुळे उत्पन्न झालेली बिकट आर्थिक परिस्थिति व तीमुळे येणाऱ्या अनेक अडचणी व आपत्ति ह्याहि

चित्रपट, बैठे खेळ व लघुकथा याचे आकर्षण जबरदस्त दिसू लागले आहे व त्यामुळे, शहराची लोकसंख्या जरी अतिशय वाढलेली असली, तरी, त्या प्रमाणात चागल्या होतकरू तरुण खेळाडू-वीराची सख्या बिलकुल दिसत नाही या अनास्थेचा सार्वत्रिक परिणाम होऊन जागतिक स्पर्धेत उतरणारा आपला भारतीय क्रिकेट सघ पूर्वीपेक्षा प्रबळ ठरण्याऐवजी कमकुवत होऊ लागला आहे, हे अलीकडील पाश्चात्य सघाविरुद्ध कसोटी सामन्यातले आपले निकाल पाहिले असता स्पष्ट होईल

तरुण खेळाडूत पूर्वीइतका सार्वनिक जोम व उत्साह भोवतालच्या दूषित वातावरणामुळे व आर्थिक अडचणीमुळे दिसत नसला, तरी काही निवडक होतकरू व उत्साही तरुण विद्यार्थी जर भारतीय वरिष्ठ क्रिकेट नियामक सस्थेने व तिच्याशी सलग्न असलेल्या निरनिराळ्या प्रातीय सस्थानी हाती घेऊन त्याच्यावर विशेष मेहनत घेऊन त्याना शिक्षण देण्याचा व त्याची तयारी करून घेण्याचा उपक्रम दरवर्षी खास वर्ग काढून सुरू केला तर, आपला क्रिकेट सघ हल्लीप्रमाणे मागासलेला ठरणार नाही व लवकरच जागतिक स्पर्धेत इतर क्रिकेटप्रेमी देशाशी बरोबरीने दोन हात करील अशी खात्री आहे

१९२८ मध्ये मध्यवर्ति अखिल भारतीय क्रिकेट नियामक मडळ स्थापन झाल्यावरच, गेल्या पचवीस वर्षात अधिकृत व मान्य असे टेस्ट ( कसोटी ) सामने, भारत, इतर देशाबरोबर येथे अगर इतरत्र लढू लागला पण त्यापूर्वीहि खासगी दौरे आपल्या सघानी परदेशात काढले होते व परकीयाचे सघ येथे आल्यावर त्याच्याशी अनधिकृत सामने दिले होते १९२८ पूर्वीचे सामने जे परकी सघाबरोबर झाले त्यात खालील काहीचा उल्लेख करणे जरूर आहे आपल्या खेळाच्या प्रगतीला त्यानी खासच हातभार लावला होता

१८८८ मध्ये पुन्हा दुसरा पारशी संघ सफरीवर गेला व त्याने दोन वर्षां-पूर्वीपेक्षा चांगली कामगिरी करून ३१ सामन्यांपैकी ८ जिंकले, ११ हरावे लागले व १२ अनिर्णित राहिले.

१८८९-९० मध्ये इंग्रजांचा खासगी संघ 'व्हर्नान'च्या नेतृत्वाखाली भारतात आला व त्याने १३ सामन्यांपैकी १० जिंकले, २ अर्धवट राहिले व एकात इंग्रजांचा पराभव झाला. विशेष म्हणजे हा शेवटचा सामना मुंबईच्या पारशी संघाविरुद्ध होऊन त्यात इंग्रजांचा चार बुइ-केट्सनी पराभव झाला.

१८९२ मध्ये लॉर्ड 'हॉक'ने असाच एक स्वतःचा संघ येथे आणला. त्यांत एफ्. एस्. जॅक्सन हा उत्कृष्ट खेळाडू असून, त्याला पुढे ऑस्ट्रे-लियाविरुद्ध टेस्ट सामन्यात इंग्रज संघाचे नेतृत्व १९०५ मध्ये देण्यात आलें होतें इतका तो प्रगत झालेला होता. अर्थातच अशा इंग्रज वीरांबरोबर खेळण्याने, भारतीयांना खेळात उत्तम तऱ्हेचे अनायासे शिक्षण मिळत गेलें. 'हॉक'च्या संघाचे जे २३ सामने झाले, त्यात इंग्रजांनी १५ जिंकले, ६ अर्धवट राहिले व २ मध्ये त्यांचा पराभव झाला. पारशी खेळाडू त्या वेळी भारतीय क्रिकेटच्या आघाडीवर असल्याने, त्यांनी 'हॉक' संघाचा पराभव करण्याचे श्रेय संपादन केलें.

१९०२ साली ऑक्सफर्ड ऑथेंटिक्स नावाचा इंग्रज संघ भारतास भेट देऊन गेला व त्याने १९ पैकी १२ जिंकले, ५ अनिर्णित राहिले व दोन त्याला हरावे लागले.

१९११ मध्ये आपला प्रातिनिधिक संघ विलायतेत धाडण्यात आला. आता-पर्यंत असा निवडक संघ गेला नव्हता व साहजिकच तेथे झालेल्या सामन्यांनी भारतीय खेळाच्या प्रगतीचा कस या वेळी ठरला; व आपण गेल्या २५ वर्षांत बरीच सुधारणा केल्याचे दिसले; व म्हणून प्रबळ इंग्रजांविरुद्ध झालेल्या २३ सामन्यांपैकी ६ तरी जिंकू शकलो. २ अर्धवट राहिले व १५ त आपला पराभव झाला. या

दौऱ्यात के. एम्. मिस्त्री व डॉ. कागा यानी फलदाजीत व पी. वालू व वॉर्डन या जोडीने गोलदाजीत उत्कृष्ट कामगिरी केली. वालूने एकदर ११४ बुइकेट्स् घेतल्या व मेहेरमजीने एकूण १२२७ धावा पुऱ्या केल्या व गोलदाजीत व फलदाजीत अनुक्रमें या दोघानी पहिला क्रम पटकावला.

१९२६ साली 'गिलिगन'च्या नेतृत्वाने एक पहिल्या दर्जाचा इग्रज सघ आला व त्याचे २८ सामने येथे झाले त्यातले ९ त्यानी जिकले व बाकीचे पुरे झाले नाहीत. मुबईत जो अखिल भारतीय सघाविरुद्ध 'टेस्ट'च्या धर्तीवर सामना झाला त्यात भारतीय सघाने पहिल्या डावात प्रतिपक्षाचा पराभव केला. या चुरशीच्या सामन्यात एम् सी. सी च्या सघाच्या ३६२, तर भारतीयाच्या ४३७ धावा झाल्या पहिल्या डावातील या पाऊणशे धावाच्या विजयाने, अखिल भारतीय मडळाची स्थापना करण्याच्या कल्पनेचा उगम झाला व त्याचा परिणाम म्हणून १९३२ पासून आपले खरे अधिकृत टेस्ट सामने भरविण्यास सुरवात झाली.

घालविले व बाकीचे अपुरे राहिले झालेल्या ४ टेस्टपैकी २ त्याने व २ भारतीयानी जिकल्याने भारताचा लौकिक थोडा तरी वाढला

१९३६ मध्ये भारताचा अधिकृत सघ इग्लडमध्ये दुसऱ्या वेळी धाडण्यात आला पण मवनेता अननुभवी व काही खेळाडू बेशिस्त असल्याने भारताचे हसे झाले व झालेल्या तीन टेस्टपैकी दोनमध्ये भारताचा दणदणीत पराभव झाला व एक अपुरा राहिला एकदर साघ्या २८ सामन्यापैकी आपण फक्त ५ जिकले

१९३७ मध्ये इग्रज लॉर्ड 'टेनिसन'नी आपला खाजगी सघ येथे आणला झालेल्या २४ पैकी त्यानी ८ जिकले, ५ हरले व ११ निकाली निघू शकले नाहीत

१९४५ मध्ये 'हॅसट'च्या देखरेखीखाली, ऑस्ट्रेलियन लष्करी सघाने भारतास भेट दिली त्याचे ९ सामने झाले पैकी ६ अपुरे राहिले, १ त्याने जिकला व २ घालविले ३ टेस्टपैकी २ अपुरे राहिले व १ हॅसेट सघ हरला

१९४६ मध्ये आपला अधिकृत सघ तिसऱ्या वेळी इग्लडच्या स्वारीवर गेला व त्याने पूर्वापेक्षा निर्विवादपणे उत्तम कामगिरी केली एकूण ३३ पैकी १३ जिकले, ४ हरले व १६ अनिर्णित राहिले ३ टेस्ट-पैकी मात्र आपण १ हरलो व बाकीचे निकाली निघू न शकल्याने आपण 'रबर' घालविले

१९५१ मध्ये एम् सी सी चा सघ आला व त्याचे जे ५ टेस्ट सामने झाले त्यात शेवटी मद्रास येथ भारताने आपला पहिला टेस्ट विजय इग्लडविरुद्ध सपादन केला इग्लडने कानपूरचा चौथा जिकला व पहिले तीन अनिर्णित राहिले

१९५२ मध्ये प्रथमच पाकिस्तानचा सघ भारतीय दौऱ्यावर आला पण हा सघ अननुभवी व नवीन असल्याने भारताला त्यावर जिंकण्यास कष्ट पडले नाहीत पाच टेस्टपैकी भारताने दोन, पाकने एक जिकला व बाकीचे दोन अपुरे राहिले

१९५२ च्या मे ते सप्टेंबरपर्यंत भारताने इग्लडमध्ये चौथा दौरा काढला झालेल्या ४ टेस्टपैकी आपण ३ हरला व १ अपुरा राहिला

१९५३ जानेवारी ते एप्रिलपर्यंत भारतीयानी प्रथमच वेस्ट इडीजला भेट दिली तेथे झालेल्या चार टेस्ट सामन्यात एक फक्त वेस्ट इडियनानी जिकून 'रबर' मिळविले बाकीचे तीन अपुरे सोडावे लागले

वरील निकालाच्या यादीवरून स्पष्ट दिसेल की, आपल्या वरिष्ठ मडळाला जरी अनेक वर्षे अनुभव मिळत गेला तरी त्याने नवे खेळाडू सतत तयार करण्याची देशव्यापी योजना न आखल्याने, भारतीय क्रिकेटची अपेक्षित प्रगति झाली नाही

★ ★ ★

प्रकरण ४ थे

# आंतरराष्ट्रीय क्रिकेटस्पर्धेत भारत अजून मागे कां ?

भारताला क्रिकेटची प्रथम ओळख व परिचय होऊन जवळजवळ एक शतक लोटले मुंबईसारख्या मोठ्या बंदरात ब्रिटिश नाविक व लष्करी सैनिकांची रहदारी नेहमीच अनेक कारणांनी असे व बंदरात तळ असताना करमणुकीचे साधन म्हणून ते आपसात क्रिकेटचा डाव मांडीत असत लष्कराला माल पुरविण्याच्या व्यापारी निमित्ताने, त्या जुन्या काळी, पारशी तरुणांचा ब्रिटिश खेळाडूंशी परिचय झाला व नवीन खेळ– विशेषत पुढारलेल्या पाश्चात्यांचा व राज्यकर्त्यांचा म्हणून– ते या खेळाने आकर्षित झाले व मिळेल त्या साधनांनी व पद्धतींनी त्यांनी कशीतरी खेळास सुरवात केली पुढे हळूहळू विस्तार पावलेल्या या वृक्षाचे बीजारोपण असे सहजगत्या झाले असावे अशा रीतीने खेळाचे बी रुजून, लहानसे रोप तयार होण्याला पुढील पाव शतक व त्याने बळकट मूळ धरून फांद्यांचा विस्तार होण्याला आणखी तेवढाच काळ लागून, चालू शतकाच्या सुरवातीस या खेळाची आवड नुसत्या मुंबई मद्रास, कलकत्ता वगैरे ब्रिटिश कंपनी सरकारच्या मुख्य लष्करी ठाण्यातच नव्हे, तर इतर मध्यम वस्तीच्या शहरातहि वाढू लागली. खेळाच्या भावी विस्ताराच्या आणि प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट

म्हणजे शाळा-कॉलेजातील विद्यार्थीवर्गावर खेळाची मोहिनी गेल्या शतकाच्या अखेरीस पडू लागली व पुण्या-मुंबईच्या शाळा-कॉलेजांकरिता स्वतंत्र टूर्नामेंट भरविल्या जाऊ लागल्या. क्रिकेटची आवड तरुणांत निर्माण करण्यात मुंबईचे क्रिकेटपटु गव्हर्नर, लॉर्ड हॅरिस याचे प्रयत्न उल्लेखनीय ठरतील. मुंबई विश्वविद्यालयान्तर्गत कॉलेजासाठी, मुंबईचे गेल्या शतकातले गव्हर्नर 'नॉर्थकोट' याच्या नावाने एक चांदीची ढाल, चालू शतकाच्या आरंभी ठेवली गेली व ती जिंकण्याच्या स्पर्धेतून अनेक चांगले खेळाडू निर्माण होऊ लागले व खेळाची प्रगति झपाट्याने होऊ लागली.

१९०० ते १९२५ पर्यंतच्या खेळाच्या तिसऱ्या कालखंडात प्रमुख शहरांत क्रिकेटचा एवढा विस्तार झाला, की आपण आंतरराष्ट्रीय स्पर्धेत पाऊल का टाकू नये व खेळात इंग्रजांची बरोबरी का करू नये, असा विचार हिंदी क्रिकेटधुरीणांच्या मनात डोकावू लागला. मुंबईत भरणाऱ्या वार्षिक तिरंगी व चौरंगी सामन्यात हिंदु, पारशी व इस्लाम संघांनी स्थानिक इंग्रज संघाला उत्तम लढत दिली होती. शिवाय १९२६ साली भारतास भेट देणाऱ्या गिल्लिगनच्या नेतृत्वाखालील एम्. सी. सी. संघावर अखिल भारतीय संघाने मात केली होती. खेळाची अशी प्रगति होत असल्याने, जागतिक

पोचून, मुंबईसारख्या संपन्न व विस्तृत शहरातहि रणजी करंडकाचे राष्ट्रीय महत्त्वाचे सामने भरविणे आर्थिक तोटयाचे होऊ लागले आहे. आंतरराष्ट्रीय कीर्तीचे व तेहि नवीन परके वीर जेव्हा पाहण्याची संधि असेल, अशा अपवादप्रसंगीच व फक्त चारच शहरात— म्हणजे मुंबई, मद्रास, कलकत्ता व दिल्ली या अत्यंत मोठ्या शहरात— टेस्ट सामन्याना भरपूर गर्दी लाभते. इतर लहानमोठ्या शहरात मोठ्या क्रिकेट सामन्याची आर्थिक जबाबदारी पत्करण्यास कोणी धजत नाही व कमी खर्चाच्या साध्या स्थानिक सामन्यावर त्याना संतुष्ट राहून आपली हौस भागवावी लागते. आपली प्रगति खुंटून राहण्याला जे मुख्यत्वाने दोषी आहेत, त्यात आपले वरिष्ठ नियामक मंडळ, त्यास संलग्न शाखा म्हणजे प्रांतिक संस्था, आपल्या अनेक शिक्षणसंस्था, नगरपालिका व ज्याना खेळाची आवड व ऐपत आहे असे धनिक लोक— याचाहि अर्थातच वाटा आहे.

( १ ) आपले खेळातील स्थान व गुण कोणते, याची खरी कसोटी 'टेस्ट'च्या मैदानावरच होणार असते व तेथे जो श्रेष्ठ ठरेल त्याचा खेळातला दर्जा व स्थान आपोआपच वरचे ठरते. गेल्या दोन शतकातला टेस्ट सामन्याचा इतिहास जर आपण पाहिला, तर आपल्या पराभवाचे मूळ कारण आपल्या खेळाडूंचा कमीपणा हे नसून, वरिष्ठ मंडळाने जे नायक नेमले त्याच्या नालायकीत व चुकीच्या धोरणात दिसून येईल. संस्थानिक, महाराजकुमार, नबाब अगर त्याचे आश्रित अशाच्या हातात पैशामुळे अगर सत्तेमुळे मोठ्या सामन्याची सूत्रे दिली गेल्यास जय मिळाला तरच आश्चर्य ! गलबताचे सुकाणू तज्ञाशिवाय भलत्याच्याच हाती दिल्यास ते खडकावर फुटणार हे निश्चित. भारतीय नियंत्रण मंडळाने आपला कारभार इतर कित्येक बाबतीतहि, गटबाजीने नालायक व स्वार्थी, तसेच कित्येक वेळा खेळाचे थोडेमात्र ज्ञान नसणाऱ्याच्या हाती सोपविल्याने, अलीकडे खेळापेक्षा त्याच्या राजकारणावर व सत्तासंपादनावर जास्त भर दिला जात आहे, व हेच आपल्या क्रिकेटच्या अवनतीचे मुख्य कारण आहे. त्यामुळे अनुभवी, तज्ञ व निःस्वार्थी कार्यकर्त्यांना मुद्दाम दूर ठेवण्यात येते. खेळात अर्थातच प्रगति होत नाही.

कौशल्याचे शक्य तेव्हा अनुकरण करून, भारतीय खेळाडूनी खेळात कौतुकास्पद प्रगति केली व तिचा वेग तसाच पुढे चालू राहता तर, चौथ्या म्हणजे अलीकडच्या पचवीस वर्षांत आपण निश्चितपणे जागतिक चढाओढीत अग्रभागी नसलो, तरी त्याच्या जवळपास तरी स्थान मिळवले असते पण आपले वरिष्ठ मडळ या ना त्या कारणानी भारतीय क्रिकेटचा दर्जा सुधारू शकले नाही व म्हणून, फुलाना बहर यावा पण अपेक्षित फळें धरू नयेत किंवा ती गळून जावी, असा प्रसग भारतीय क्रिकेटवर आला आहे म्हणून भारतीय क्रिकेटचा आतरराष्ट्रीय तुलनेत क्रमाक कोणता, याचे उत्तर देताना शेवटाकडून मोजणी करावी लागेल एक तुलनेने नवीन, अल्पवयीन व लहान देश– पाकिस्तान अलीकडे जन्मास आल्याने, भारताला शेवटचे स्थान मिळणार नाही, किंवा सध्या तरी मिळाले नाही, एवढे म्हणता येईल भारत आतापर्यंत इग्लड, ऑस्ट्रेलिया, वेस्ट इडीज व पाकिस्तानविरुद्ध टेस्ट सामने अनेक वेळा खेळला, पण अजून त्याने पाकिस्तानखेरीज इतरावर 'रबर' म्हणजे विजयाधिक्य मिळवून आपले श्रेष्ठत्व केव्हाहि प्रस्थापित केलेले नाही. इग्लड व वेस्ट इडीजविरुद्ध फक्त एक एकच 'टेस्ट' जिकला, पण ऑस्ट्रेलियाविरुद्ध तेहि अजून साध्य झाले नाही राष्ट्रकुलातले राहिलेले दक्षिण

पोचून, मुंबईसारख्या संपन्न व विस्तृत शहरांतहि रणजी करंडकाचे राष्ट्रीय महत्त्वाचे सामने भरविणें आर्थिक तोट्याचे होऊं लागलें आहे. आंतरराष्ट्रीय कीर्तीचे व तेहि नवीन परके वीर जेव्हां पाहण्याची संधि असेल, अशा अपवादप्रसंगींच व फक्त चारच शहरांत– म्हणजे मुंबई, मद्रास, कलकत्ता व दिल्ली या अत्यंत मोठ्या शहरांत– टेस्ट सामन्यास भरपूर गर्दी लाभते. इतर लहानमोठ्या शहरांत मोठ्या क्रिकेट सामन्याची आर्थिक जबाबदारी पत्करण्यास कोणी धजत नाही व कमी खर्चाच्या साध्या स्थानिक सामन्यावर त्यांना संतुष्ट राहून आपली हौस भागवावी लागते. आपली प्रगति खुंटून राहण्याला जे मुख्यत्वाने दोषी आहेत, त्यांत आपलें वरिष्ठ नियामक मंडळ, त्यास संलग्न शाखा म्हणजे प्रांतिक संस्था, आपल्या अनेक शिक्षणसंस्था, नगरपालिका व ज्यांना खेळाची आवड व ऐपत आहे असे धनिक लोक– यांचाहि अर्थातच वाटा आहे.

(१) आपलें खेळांतील स्थान व गुण कोणते, याची खरी कसोटी 'टेस्ट'च्या मैदानावरच होणार असते व तेथें जो श्रेष्ठ ठरेल त्याचा खेळांतला दर्जा व स्थान आपोआपच वरचें ठरतें. गेल्या दोन शतकांतला टेस्ट सामन्यांचा इतिहास जर आपण पाहिला, तर आपल्या पराभवाचे मूळ कारण आपल्या खेळाडूंचा कमीपणा हें नसून, वरिष्ठ मंडळाने जे नायक नेमले त्यांच्या नालायकीत व चुकीच्या धोरणांत दिसून येईल. संस्थानिक, महाराजकुमार, नबाब अगर त्यांचे आश्रित अशांच्या हातांत पैशामुळे अगर सत्तेमुळे मोठ्या सामन्यांची सूत्रें दिली गेल्यास जय मिळाला तरच आश्चर्य ! गलबताचें सुकाणू तज्ञाशिवाय भलत्याच्याच हातीं दिल्यास तें खडकावर फुटणार हें निश्चित. भारतीय नियंत्रण मंडळाने आपला कारभार इतर विलायेक

(२) खेळातले गुण व कौशल्य सुधारण्यास कोणतीहि कायम स्वरूपाची उपयुक्त याजना न करता, आपले मध्यवर्ति मडळ टेस्ट सामन्यात मिळणारा निधि वायफळ प्रवास भत्ते, कचेरी-खर्च वगैरेवर ओतीत असत नवीन होतकरू तरुणाचे शिक्षण, मार्गदर्शन व उत्तेजन यासाठी पुरेसा पैसा अर्थातच शिल्लक राहत नाही

(३) प्रातिक क्रिकेट मस्थापैकी बहुसख्य दरिद्री आहेत जास्त खेदाची गोष्ट म्हणजे हे दारिद्रच केवळ पैशाच नसून उत्साही व निस्वार्थी अशा कार्यकर्त्याचेहि आहे त्यामुळे रोजचा खेळाचा सराव करणे व साप्ताहिक साधे सामने नीट व्यवस्थित रीतीने भरविणे या साध्या गोष्टीहि पार पडत नाहीत मग नवीन लायक तरुण हुडकून काढून त्याना उत्तेजन व थोडे फार शिक्षण देऊन तयार करण ही कर्तव्यें दूरच याचा परिणाम म्हणजे चागल्या नावारूपाला आलेल्या क्रिकेट क्लब व जिमखान्याची मैदाने वर्षा-तून बहुतेक दिवस ओस पडलेली दिसतात आपल्या क्लबाचा सर्वोत्कृष्ट सघ तयार करून मोठमोठ्या स्थानिक व बाहेरील सघावर विजय मिळ विण्याची महत्त्वाकाक्षा अभावानेच हल्ली नजरत भरताना दिसेल त्यामुळे जरी काही ठिकाणी खेळाडूची सख्या फुगलेली दिसली तरी त्या मानाने गुण कमी पडलेले दिसतील अगोदरच खेळाडू-युवकाचा उत्साह कमी व त्यात मार्गदर्शक नत्याची व कार्यकर्त्याची उणीव पडत चालल्याने क्रिकेटच्या प्रगतीत पुढे पाऊल पडत नाही असा वटु अनुभव येऊ लागला आहे

(४) होतकरू तरुण जर आपण होऊन मैदानावर नियमाने न चुकता उपस्थित होत राहतील व खेळाचा सराव सतत सुरू ठेवतील, तरी पुष्कळसा कार्यभाग होण्यासारखा आहे पण शहरातील तरुणाना हल्ली बठे खेळ व तेहि सभिश्र तसच कादबऱ्या व लघुकथा, चलच्चित्रपट व हेहि नसले तर रिकामटेकडेपणाच्या गप्पा, याचे जास्त आकर्षण वाटू लागल्याने, सध्याकाळी आपण होऊन क्रीडागणावर उतरण्याची उत्सुकता दिसत नाही भलत्या करमणुकीच्या मार्गांनी प्रकृति बिघडून ताकद घटत जाते व जो जो ताकद व उत्साह घटत जातात, तो तो घमाधकीचे मैदानी व मर्दानी खेळ नकोसे वाटू लागतात व शेवटी आपल्या दुबळेपणाला

लोक हसतील म्हणून युवक मैदान टाळू लागतो या आपत्तीच्या चक्रव्यूहात अगर भोवऱ्यात भावी खेळाडू अडकून निराशेच्या खड्डयात पडू लागतात हे संकट टाळण्यास ज्याना खेळात सुधारणा करण्याची थोडी तरी आशा असेल, त्यानी निश्चयाने व नेटाने, खेळाचा अभ्यास सुरू ठेवला पाहिजे. कोणत्याहि मेहनतीच्या व व्यायामाच्या खेळात, यशाचे अत्युच्च शिखर गाठण्यास पन्नास टक्के मदत उत्तम आरोग्य व सामर्थ्य याची होत असते. तन्दुरुस्तीच्या मजबूत पायावरच पुढील सर्व प्रगति अवलबून असते

( ५ ) मुलानी यथेच्छ खेळावे व लहानपणी आरोग्य सपादन करावे म्हणून प्रत्येक लहानमोठ्या नगरपालिकानी आपल्या अधिकारात ठिकठिकाणी उघडी प्रशस्त मैदाने तयार केली पाहिजेत. नागरिकाच्या आरोग्याच्या दृष्टीने हे त्याचे कर्तव्य आहे याची जाणीव फार थोडया ठिकाणी असते घराजवळ मैदाने नसल्याने मुलाची खेळासबधी नैसर्गिक आवड मरून जाते व सध्याकाळी मैदानावर न जाता ती मुलगा अनिष्ट ठिकाणी जाऊ लागतात व विघडतात असा वाईट अनुभव आलेला आहे शाळाप्रमुखानी व शिक्षक-पालकानीसुद्धा या कर्तव्याची उपेक्षा केलेली दिसेल. शिक्षकापैकी क्वचितच मैदानावर जाऊन मुलाना स्वत उत्तेजन देताना आढळतील उपदेशापेक्षा उदाहरण जास्त परिणामकारक असते हे शिक्षक तसेच पालक विसरतात, ही खेदाची गोष्ट आहे आपल्या देशात खेळाची पीछेहाट होत आहे, चागले खेळाडू निर्माण होत नाहीत व आपण जागतिक स्पर्धेत मागे पडत आहो, याचे खरे व महत्त्वाचे कारण या विषयात शिक्षक-पालकाची अनास्था व अज्ञान ही होत

( ६ ) आपण पाश्चात्याच्या मानाने खेळात जास्तजास्त मागे पडत चाललो आहोत याचे आणखी एक महत्त्वाचे कारण सहज दिसेल पाश्चात्य खेळ बहुतेक महाग आहेत व आपले आर्थिक दारिद्र्य गेल्या महायुद्धानतर इतके पराकोटीला गेले आहे की ज्या मध्यम वर्गामधून चागले खेळाडू निपजणार तो वर्ग जीवनकलहात पूर्ण बुडून गेला आहे मेहनतीच्या खेळाना लागणारी साधनसामग्री तर दूरच, पण योग्य सकस आहारसुद्धा कित्येक कुटुबात दुर्लभ झाला आहे. त्याचा अटळ परिणाम म्हणजे तरुणात इतकी

दुर्बलता आलेली आहे, की मैदानावर जाऊन प्रतिस्पर्ध्याशी दोन हात करण्याइतकी अगर अगातून घाम गळेल इतकी मेहनत करण्याची ताकत व उत्साह त्याच्यात उरत नाही अभ्यासाने दिवसभर मनावर ताण पडल्याने शाळा-कॉलेजमधील विद्यार्थ्यांना मैदानी खेळ मनोरजक वाटत नसून दगदगी-चे वाटत असावे अगात रग असणाऱ्या तरुण विद्यार्थ्याला, एरवी, सोंगड्या-बरोबरच थोडीतरी दगामस्ती केल्याशिवाय चैन पडणार नाही तरुणाना 'मैदानावर या व खेळा ' असे सागावयास लागणे हा त्याच्या दुबळेपणाचा स्पष्ट पुरावा आहे साधे धावणे अगर चालणे ज्याना नीट साधत नाही, असे कित्येक तरुण अलीकडे अनेक ठिकाणी सहज दिसतील

( ७ ) इग्लड व इतर युरोपीय राष्ट्रें, तसेच जपान, ऑस्ट्रेलिया व अमेरिका वगैरे देश खेळात अत्युच्च शिखरावर पोचले आहेत त्याचे प्रमुख खेळाडू, खेळाचा नुसता अभ्यासच करीत नसून, तो व्यवसाय व धदा करू शकतात, इतकी आर्थिक सुस्थिति व खेळाची आवड त्या देशातील जनतेत पूर्वीच निर्माण झाली आहे याउलट भारतात खेळाडूना पोटापाण्याची काळजी सभाळून, फावल्या वेळी शौक म्हणून, आपल्या आवडीच्या खेळाकडे लक्ष द्यावे लागते कोणत्याहि क्षेत्रात धदेवाईक मनुष्य जे कौशल्य मिळवील व टिकवील तितके हौसेखातर ते काम पत्करणाऱ्यास कधीच साधणार नाही हे स्पष्ट आहे म्हणूनच प्रत्येक महत्त्वाच्या स्पर्धेत, धदेवाईक खेळाडू इतके प्रबळ ठरतात की त्याना ऑलिंपिकसारख्या जागतिक खेळातून मुद्दाम वगळावे लागले आहे क्रिकेटमध्ये मात्र टेस्ट सामन्यात धदेवाईक खेळाडूना मनाई नाही व इग्लडचे या खेळातील श्रेष्ठत्व व सामर्थ्य या बहुसख्य धदे-वाईक खेळाडूवर अवलबून असत ऑस्ट्रेलिया.

वरील अनेक अडचणी व दोष एकाएकी दूर होणे हल्लीच्या आर्थिक टचाईच्या दिवसात शक्य नाही व अर्थातच जागतिक स्पर्धेचे खेळ आपल्या देशात समाजाच्या खालच्या थरापर्यंत पसरण्याला थोडीसुद्धा आशा नाही, पण क्रिकेटसारख्या खेळातील प्रगतीची रुंदी जरी वाढवता आली नाही तरी खोली वाढवणे अवघड नाही थोड्या निवडक होतकरू तरुणाना खास उत्तेजन व शिक्षण देऊन व त्यांच्याकडून सक्त मेहनत घेऊन त्यांचा अव्वल दर्जाचा संघ तयार करणे शक्य आहे जागतिक दर्जा संख्येवरून ठरत नसून, कोठेहि गुणावरून ठरतो ब्रॅडमनच्या पराक्रमाने ऑस्ट्रेलिया गेली वीस वर्षे प्रबळ इंग्रज संघावर मात करीत होता, हे आपण पाहिले नाही का ? थोडेच का होईना, पण असे सर्वोत्कृष्ट वीर तयार करण्यावर लक्ष केंद्रित करणे हल्ली भारतात इष्ट व शक्य आहे सत्ताधारी वरिष्ठ मडळ या दिशेने प्रयत्न करील व चांगलीशी शिक्षणयोजना आखील, तेव्हाच आपल्या खेळात प्रगति होईल ज्याना खेळाची आवड असेल अशा सधन कुटुबानी आपल्या मुलात खेळाची ईर्षा व आवड उत्पन्न केल्यास रणजी, दुलीप, नायडू, विजय मर्चंट यासारखे जागतिक कीर्तीचे खेळाडू तयार करता येतील असे स्पष्ट दिसून आलेले आहे तसेच, गरीब परंतु लायक तरुणाना उत्तेजन देण्यास सरकार, नगरपालिका व क्रीडासंस्था यानी स्वतंत्र निधि उभारून एखादी योजना आखणे अवश्य आहे सत्पूर्वी सर्व दोषांच्या मुळाशी असलेली सार्वजनिक अनास्था प्रथम दूर झाली पाहिजे, तरच हळूहळू प्रगतिपथाचे पुढील टप्पे गाठून इतर राष्ट्रांची बरोबरी करता येईल

ॐ

★ ★ ★

घासून त्याला पैलू पाडून, त्याची मूळची चमक वाढविणे व त्याचा अलंकार बनविणे एवढेच कोणताहि सुवर्णकार करू शकतो याचाच अर्थ–' जीनिअस इज बॉर्न ' म्हणजे गुणप्रकर्ष जन्मजात असावा लागतो, तो निर्माण करू म्हटल्याने होत नाही क्रीडाक्षेत्रातहि रणजी, दुलीप, ब्रॅडमन किंवा हॅमंड-सारखे जे वीर चमकले त्याचे काही गुण स्वयंसिद्ध होते यात शंका नाही पण त्यामुळे खेळात शास्त्रोक्त शिक्षणाचे महत्त्व कमी होत नाही, किंबहुना असं म्हणता येईल, की जर वरील खेळाडूंना लहानपणी चागले शिक्षक लाभले असते तर, त्याच्या नैसर्गिक गुणाचा जास्त विकास झाला असता व त्याना जास्त यश लाभले असते

ही झाली असामान्याची गोष्ट सर्वसाधारण व सामान्य खेळाडूच्या बाबतीत तर सुरवातीस मिळत जाणारे धडे फार उपयुक्त ठरतात चागल्या अनुभवी शिक्षकाच्या हाताखालून गेलेला विद्यार्थी जरी मूळचा दुबळा व अडाणी असला तरी तो पुष्कळ सुधारू शकतो व अव्वल दर्जाचा नसला, तरी दुय्यम म्हणजे बऱ्यापैकी खेळाडू म्हणून सामान्य सघात उपयुक्त ठरतो त्याच्या खेळात विशेष तडफ अगर चमक जरी उत्पन्न झाली नाही तरी, तो सामान्य सैनिकाप्रमाणे आपली नेमून दिलेली कामगिरी बजावतो व इतराना भारभूत ठरत नाही

क्रीडाशिक्षकाने खालील महत्त्वाचे नियम अगर मार्ग पाळले तर त्याने आपले कर्तव्य नीट केले असे म्हणता येईल

( १ ) क्रीडाशिक्षण म्हणजे प्रत्यक्ष मैदानावर शिक्षण, व बौद्धिक म्हणजे वर्गात दिले जाणारे शिक्षण, या दोघात एक महत्त्वाचा फरक आहे पहिल्यात तात्त्विक चर्चा व पुस्तकी ज्ञान अगदी कमी व प्रत्यक्ष सराव व कृति जास्तीत जास्त असावी लागते क्रिकेटची लेखी परीक्षा असती तर गोष्ट वेगळी, पण खेळाची परीक्षा प्रात्यक्षिक म्हणजे मैदानावर होणार असल्याने, वाजवीपेक्षा जास्त तात्त्विक ज्ञान अपायकारक ठरत लेगकडे चेंडू आला असता, रणजीचा 'लेग ग्लाइड' करू का हॉब्सचा, असा मनात विकल्प आल्यास दांडी उडण्यातच त्याचे पर्यवसान होईल अर्थातच शिक्षकाने खेळाची प्रत्येक बाजू विद्यार्थ्याकडून त्याच्या पद्धतीप्रमाणे घटवून

# क्रिकेटमध्ये शिक्षणाचें महत्त्व

कोणत्याहि शास्त्रात, कलात अगर व्यवसायात अनुभवावर आधारलेले काही नियम, रीति अगर प्रथा असतात व त्या अभ्यासून पाळल्याशिवाय त्या त्या क्षेत्रात त्वरित प्रगति होणे शक्य होत नाही. प्रत्येक गोष्ट प्रत्येकजण स्वत.च शिकू लागल्यास वेळेचा व सामर्थ्याचा अपव्यय होऊ लागेल व नवीन ज्ञान व शोध दुरापास्त होऊ लागतील. म्हणूनच जुनें पूर्वीचे ज्ञान व माहिती एकत्र उपलब्ध करून देण्यास शिक्षकाची जरुरी असते. पण खऱ्या शिक्षकाचे काम एवढेंच असत नाही. तर शिष्यास त्या त्या पाठ्य विषयाची गोडी अगर आवड लावून त्याच्यात उत्साह व स्फूर्ति उत्पन्न करण्याची मोठी कामगिरी गुरूला करावी लागते. या दृष्टीने शिक्षकाचे स्थान जरी उच्च असले तरी त्याचे महत्त्व मर्यादित आहे. कारण शिक्षक कितीहि उत्कृष्ट असला तरी तो मुळात नसलेली वृद्धि व शक्ति निर्माण करू शकत नाही; फक्त असतील त्या गुणाना घासून, झिलई देऊन, स्वच्छ करून, प्रकाशमान करतो; यापलीकडे तो जाऊ शकत नाही. कारागीर कितीहि कुशल असला तरी, रत्न मुळातच निर्माण करणें त्याला कधीहि साधणार नाही. खाणीत निसर्गाने उत्पन्न केलेला हिरा स्वच्छ करून,

घासून त्याला पैलू पाडून, त्याची मूळची चमक वाढविणे व त्याचा अलंकार बनविणें एवढेंच कोणताहि सुवर्णकार करू शकतो याचाच अर्थ– जीनिअस इज बॉर्न' म्हणजे गुणप्रकर्ष जन्मजात असावा लागतो, तो निर्माण करू म्हटल्याने होत नाही क्रीडाक्षेत्रातहि रणजी, दुलीप, ब्रडमन किंवा हॅमंड-सारखे जे वीर चमकले त्याचे काही गुण स्वयंसिद्ध होते यात शंका नाही पण त्यामुळे खेळात शास्त्रोक्त शिक्षणाचे महत्त्व कमी होत नाही, किंबहुना असे म्हणता येईल, की जर वरील खेळाडूंना लहानपणी चांगले शिक्षक लाभले असते तर, त्यांच्या नैसर्गिक गुणांचा जास्त विकास झाला असता व त्यांना जास्त यश लाभले असते

ही झाली असामान्याची गोष्ट सर्वसाधारण व सामान्य खेळाडूंच्या बाबतीत तर सुरवातीस मिळत जाणारे धडे फार उपयुक्त ठरतात चांगल्या अनुभवी शिक्षकाच्या हाताखालून गेलेला विद्यार्थी जरी मूळचा दुबळा व अडाणी असला तरी तो पुष्कळ सुधारू शकतो व अव्वल दर्जाचा नसला, तरी दुय्यम म्हणजे बऱ्यापैकी खेळाडू म्हणून सामान्य संघात उपयुक्त ठरतो त्याच्या खेळात विशेष तडफ अगर चमक जरी उत्पन्न झाली नाही तरी, तो सामान्य सैनिकाप्रमाणे आपली नेमून दिलेली कामगिरी बजावतो व इतरांना भारभूत ठरत नाही

क्रीडाशिक्षकाने खालील महत्त्वाचे नियम अगर मार्ग पाळले तर त्याने आपले कर्तव्य नीट केले असे म्हणता येईल

( १ ) क्रीडाशिक्षण म्हणजे प्रत्यक्ष मैदानावर शिक्षण, व बौद्धिक म्हणजे वर्गांत दिले जाणारे शिक्षण, या दोघात एक महत्त्वाचा फरक आहे पहिल्यात तात्त्विक चर्चा व पुस्तकी ज्ञान अगदी कमी व प्रत्यक्ष सराव व कृति जास्तीत जास्त असावी लागते क्रिकेटची लेखी परीक्षा असती तर गोष्ट वेगळी, पण खेळाची परीक्षा प्रात्यक्षिक म्हणजे मैदानावर होणार असल्याने, वाजवीपेक्षा जास्त तात्त्विक ज्ञान अपायकारक ठरतें लेगकडे चेंडू आला असता, रणजीचा 'लेग ग्लाइड' करू का हुक्सचा, असा मनात विकल्प आल्यास दांडी उडण्यातच त्याचे पर्यवसान होईल अर्थातच शिक्षकाने खेळाची प्रत्येक बाजू विद्यार्थ्याकडून त्याच्या पद्धतीप्रमाणे घटवून

तयार करून घेतली पाहिजे इतकी, की प्रत्येक टोला, विशेष प्रयत्न व विचार न करता, आपोआप सहजसाध्य झाला पाहिजे कोणतीहि अवघड गोष्ट अभ्यासानेच हस्तगत होते व म्हणून चागला शिक्षक एका वेळी खेळाच्या एका बाजूवर लक्ष देतो व ती बळकट करून घेण्याचा प्रयत्न करतो असे क्रमश धडे गिरवल्याने, शिष्य हळूहळू सर्वपारगत होतो

(२) खेळात प्रत्यक्ष कृतीला प्राधान्य असल्याने शिक्षकाने विद्यार्थ्याला स्वत ची, म्हणजे सोयिस्कर वाटणारी खेळाची पद्धत अनुसरण्यास पूर्ण मुभा द्यावी ती बदलण्याचा अगर आपली त्याच्यावर लादण्याचा प्रयत्न करू नये प्रत्येकाच्या शरिराची मनाची व स्वभावाची ठेवण वेगळी असते व तिला अनुसरून त्याच्या शरिराच्या हालचाली निसर्गत होत असतात त्यात काही मूलभूत दोष असल्यास मात्र तेवढे दूर करण्याचा प्रयत्न करावा सुप्रसिद्ध ब्रॅडमनचे उदाहरण या बाबतीत लक्षात ठेवण्याजोगे आहे त्याची वाकून उभे राहण्याची, बॅट जास्त खाली धरण्याची व ती वाकडी करून चेंडू टोलावण्याची पद्धत नेहमीच्यापेक्षा बरीच निराळी किंबहुना नियमबाह्य आहे असे पाहून एका अडाणी शिक्षकाने, सुरवातीसच ती पार बदलून टाकण्याचा सल्ला दिला तसे न केल्यास तुला पावसहा धावा करणेहि मुष्कील होईल, असाहि त्याने ब्रॅडमनला सुरवातीस दम भरला पण ब्रॅडमनचा स्वत च्या सोयिस्कर पद्धतीवर इतका विश्वास होता, की त्याने उपदेश बाजूस ठेवून व आपल्या मार्गाने खेळून पहिल्याच कठीण सामन्यात धावांचे द्विशतक काढले व लगेच कोणाची पद्धत श्रेष्ठ, असे त्या शिक्षकास विचारले अर्थातच तो निरुत्तर झाला व प्रत्येकाने स्वत स सोपा व सोयिस्कर ठरेल त्या मार्गानेच आपली प्रगति करावी हे तत्त्व त्याला पटले शिक्षकाने या बाबतीत माळ्याचे अनुकरण करीत असावे रोपाभोवतीचे खडेकाटे काढणे, इतर अडथळे दूर करण व नैसर्गिक वाढ होईल असेच खतपाणी घालणे, एवढी काळजी घेतल्यावर पुढील काम निसर्ग आपोआप करीत असतो

(३) क्रिकेटचा खेळ दीर्घकालीन व म्हणून दमाचा व सामर्थ्याचा असल्याने त्यात पन्नास टक्के यश, शारीरिक आरोग्य व तन्दुरुस्ती यावर

अवलंबून असते त्यात थोडाहि बिघाड होऊन, एखादी क्षुल्लक चूक जरी खेळाडूकडून सामन्यात झाली तरी, स्वतःचे व संघाचे अपरिमित नुकसान होऊ शकते उदाहरणार्थ, ज्यावर सर्व संघाची आशा असा 'हॉब्स' किंवा 'सटक्लिफ' सारखा खंदा आघाडीचा वीर खेळात लहानशी चूक झाल्याने अचानक बाद झाला, अगर उलट त्याने दिलेला सोपा झेल प्रतिपक्षीय क्षेत्र-रक्षकाने बेसावधपणें सोडला तर त्या त्या संघाचे केवढें नुकसान होईल याची कल्पनाच केलेली बरी दोघी मध अगर खेळाडू डाव तेथेंच हरले अशी परिस्थिति उत्पन्न होते अर्थातच भावी खेळाडूंना आरोग्य राखण्याचे व दम वाढविण्याचे शिक्षण देणे व तशी सवय लावणे याचाहि क्रीडा-शिक्षणात अंतर्भाव करावा लागेल यशस्वी शिक्षकाने नुसती खेळाची कला अगर शास्त्र शिकवून भागणार नाही, शिष्याला चांगल्या सवयी लागतील, त्याचे आरोग्य उत्तम राहील शील व शिस्त सुधारेल, इतके सर्वांगीण नियंत्रण पाल्याप्रमाणे शिक्षकाने अमलात आणले पाहिजे, तरच भावी इमारतीचा पाया बळकट होईल

## मैदानाची निवड

साधारणपणे ऐंशी ते शभर यार्ड लांब व तितकीच रुंद अशी मोठी सपाट व मोकळी जागा मोठ्या अव्वल दर्जाच्या सामन्यास प्रशस्त मानली जाते क्रिकेटचे स्वरूप, नियम व पद्धति ज्या प्राचीन काळी बनत गेल्या त्या वेळी हल्लीप्रमाणे मोकळ्या जागेची टंचाई– शहरातसुद्धा– नसावी असे वाटते, व म्हणून एवढे मोठे क्षेत्र सामन्यास ठेवण्याची प्रथा पडली असावी सध्याच्या गर्दीच्या दिवसात, शहराबाहेर पडल्याशिवाय, नमुनेदार मोकळे मैदान सापडणे अशक्य झालेले आहे खेळात प्रगति करणे असेल तर यापुढे नवीन नगररचनेत व वाढीत ठिकठिकाणी प्रशस्त मैदाने आखून मोकळी ठेवली पाहिजेत तत्संबधी नीट योजना सरकार, नगरपालिका व क्रीडासंस्था यानी तयार केली पाहिजे तरच त्या त्या शहरात चुरशीचे प्रेक्षणीय सामने शक्य होतील मैदान सपाट, मऊ व हिरवेगार ठेवण्याने प्रेक्षकांच्या डोळ्याना आल्हाद देईलच, शिवाय त्यामुळे खेळाडूना आपले कौशल्य दाखविण्यास पूर्ण संधि मिळून खेळ बिनधोक होईल. चेंडू वाटेल तसे, वेडेवाकडे उडत राहिल्यास, खेळाला जुगारीचे स्वरूप येऊन त्यात कोणाचे लक्ष लागणार नाही

## हिरवळ

ज्या ठिकाणी गोलंदाज चेंडू यष्टीच्या रोखाने टाकतो व ज्याला 'पिच' म्हणतात, ते अत्यंत काळजीने, सपाट, टणक व हिरवेगार ठेवावे लागते. तरच खेळाचा खरा आनंद व सुख उपभोगता येते व खेळ कला व कौशल्यपूर्ण होतो भारतातील व इतर देशातील काही ऊष्ण प्रातात हिरवळीच्या ऐवजी काथ्याची मुद्दाम तयार केलेली पातळ चटई वापरण्याची पद्धत आहे पण दुधाची तहान ताकाने भागविण्याचाच तो एक प्रकार आहे काथ्याच्या अनेक गाठीवर चेंडू जास्त-कमी उडत असल्याने अशा खेळाने, चांगल्या खेळाडूचे समाधान होत नाही व त्याना आपले कौशल्य दाखविता येत नाही. म्हणून ज्या मैदानावर मध्ये हिरवळीचे ' पिच ' नसेल, ते अधिकृत टेस्ट सामन्यास वापरू नये असे सर्व देशात वरिष्ठ क्रिकेट

मंडळात मत बनत चालले आहे. साध्या सरावाच्या वेळीहि 'पिच' काळजीनें चोपून सपाट केलेले असावें तसें नसल्यास, होतकरू नवीन खेळाडू जखमी होतो व त्याला जी एकदा खेळाची भीति बसते ती शेवटपर्यंत सुटत नाही व भित्रेपणानें त्याचा खेळ बिघडतो काथ्या-चीच चटई वापरणें जरूर असेल तर ती चांगल्या मऊ काथ्याची व सारख्या बारीक विणीची असावी तागाची असली तर श्रेयस्कर, परंतु ती जास्त महाग व कमी टिकाऊ असल्यानें, साधारण क्लबांना कधीच परवडणार नाही.

## हिरवळीचे सामन्याच्या निकालावर परिणाम

उत्तम हिरवळ वाढवून ती खेळाच्या वेळी सुस्थितीत ठेवणें हें क्लब-सेक्रेटरीचें फार महत्त्वाचें कर्तव्य आहे मोठ्या संस्थातून या कामासाठी एक पगारी मैदानाधिकारी म्हणून नेमलेला असतो व त्याच्या हातात सामन्याची सूत्रें असतात सामन्यात धावांचे डोंगर रचले जातील किंवा लहान टेंकाडेंसुद्धा दिसणार नाहीत, अशी उलटसुलट व्यवस्था तो करू शकतो मोठ्या लढतीकरिता हिरवळ तयार करण्याचें एक शास्त्र अली-कडे बनलें आहे हिरवळीची निगा ही इतकी महत्त्वाची बाजू या खेळात

हिरवळीवर खेळले जात असल्याने टाचेशिवाय रबरी तळाचा 'शू' आवश्यक मानला जातो क्रिकेटमध्ये धाकून, कधीकधी बुटाने चेंडू अडवावा लागत असल्याने जाड कातडयाचा अगर कॅनव्हासचा बूट पसत करतात क्रिकेटचे सामने कित्येक दिवस लागोपाठ चालणारे असल्याने, खास मापाचा व बाधणीचा, आरामशीर व हलका वाटणारा 'बूट' प्रत्येक खेळाडूने तयार करवून घेतला पाहिजे एवढेच नव्हे, तर तो घालून नीट पळण्याचा सराव ठेवला पाहिजे असे न केल्याने, क्रिकेट, फूटबॉल अगर टेनिसमध्ये ऐन सामन्याच्या वेळीं पादत्राण काढून टाकण्याचा हास्यास्पद प्रकार करावा लागतो; व त्याची अनेक उदाहरणे मैदानावर प्रत्यक्ष घडलेली आहेत आणखीहि एक काळजी बुटाच्या तळाचे खिळे टोकदार ठेवण्यासंबधी घ्यावी लागते नाहीतर, खिळे झिजलेले असल्यास, धाव काढताना अगर झेल पकडताना धावण्याच्या प्रयत्नात ऐन वेळी घसरून पडल्याची व अपयश आल्याची अनेक उदाहरणे प्रत्यही घडतात हा दोष टाळण्यास, प्रत्येक सघनायकाने आपल्या सैनिकाचे बूट, टोपी, पॅड व इतर पेहराव ह्या साध्या वस्तूमुद्धा नीट आहेत का, हे खेळातील यशाच्या व शिस्तीच्या दृष्टीने पाहणे जरूर आहे सघातील खेळाडू पोषाकात नीटनेटके असल्यास त्याचा आत्मविश्वास व सघभावना वाढते यात शका नाही लष्करातहि गणवेष म्हणूनच आवश्यक असतो भारतासारख्या उष्ण देशात जाड 'हॅट' घालून गोलदाजी, फलदाजी व इतर वेळच्या सर्व हालचाली सहज करण्याची सवय ठेवणे अत्यत इष्ट आहे. इग्लडच्या थड हवेत गोष्ट निराळी तेथे पातळ व लहान कॅपने काम भागते. अगात चपळता राहावी म्हणून वरील सर्व पोषाक शक्य तितका हलका, आरामशीर व सोमिस्कर असावा

## खेळांतील विशिष्ट सामग्री

खेळात बचावाची व चढाईची हत्यारे म्हणून ज्याचा उपयोग करावयाचा, ती सर्व आपल्या उचीला, शक्तीला व सवयीला अनुरूप असतील अशी, महत्त्वाच्या सामन्यापूर्वी निवडून ठेवावी क्रिकेटमध्ये बॅटीला तलवारीचे महत्त्व आहे, म्हणून ती आपल्या खुद्द पसतीची व सवयीची वापरणे श्रेयस्कर आहे हातात सहज पेलना व फिरवता येईल अशी, हलक्या

वजनाची बॅट सामन्याच्या वेळी वापरावी जड व मोठी असल्यास, 'लेट कट', 'लेगग्लान्स', 'फॉरवर्ड ड्राइव्ह' सारखे अवघड टोले सहज सफाईने व सत्वर मारता येणार नाहीत जड वजनाने फलदाजाचे हात दमतील हें वेगळेंच आपल्याला योग्य बॅट कोणती, तिचा आकार, वजन, तोल वगैरे काय असावे, हे ती टोले मारण्यापूर्वी जशी फिरवू तशी हातानी थोडा वेळ प्रयोगालादाखल फिरवल्यास सहज समजते बॅटची खरेदी करण्यात केलेली भलती काटकसर शेवटी महाग, घातक व चुकीची ठरते वाईट शस्त्र आयत्या वेळी दगा देते मग खेळातील यश व आनद दूरच राहिली लहान मुलांनी आपल्या उंचीप्रमाणे व शक्तीप्रमाणे बॅटीची पसती केली पाहिजे; तसे न केल्यास, त्याच्या खेळात वेढवपणा येईल. शिवाय खेळातला मुख्य लाभ म्हणजे जें कौशल्य, आनद व समाधान ते सर्व साधनसामग्री व्यवस्थित असल्याशिवाय कधीच लाभणार नाही 'हत्याराना नावे ठेवणारा कारागीर अडाणी' अशी जरी म्हण असली तरी कुशल कारागीर उत्कृष्ट साधनें वापरल्याशिवाय राहात नाहीत हे लक्षात ठेवावे चेडूची निवडसुद्धा तितक्याच काळजीने झाली पाहिजे. हलक्या स्वस्त चेडूनी खेळातले कौशल्य कधीच वाढणार नाही, त्यात सुरक्षितता राहणार नाही व चेडू वाटेल तसे उडून खेळाला जुगारीचे स्वरूप येईल शिवाय बॅटी फुटन नकसान होईल तसेच

# खेळाचा पाया

## तन्दुरुस्ती

जशी एखादी मोठी इमारत बाहेरून कितीहि आकर्षक, उंच, भव्य व उपयुक्त दिसत असली तरी तिचा पाया जर मजबूत नसेल तर, ती ज्याप्रमाणे केव्हा कोसळेल व दगा देईल याचा नेम नसतो, तीच स्थिति खेळातील पराक्रम, कौशल्य, धडाडी वगैरे आकर्षक गुणाची, शारीरिक तन्दुरुस्तीच्या अभावी होत असते शारीरिक आरोग्य (ज्याला आपण तन्दु- रुस्ती म्हणतों) क्रिकेटसारख्या– एखादी क्षुल्लक लहानशी चूक खपवून न घेणाऱ्या खेळात किती आवश्यक आहे, हें सहज समजेल फलदाज व क्षेत्ररक्षक याच्या हातून आजाराने, दुबळेपणाने किंवा अनवधानाने एक जरी प्रमाद घडला, तरी प्रबळ प्रतिपक्षाला अचानक जीवदान मिळून, खेळाची गति उलटून, डाव अंगावर येतो अटीतटीच्या सामन्यात डोळ्यात तेल घालून तासानुतास पाहारा करताना प्रत्येक क्षेत्ररक्षक शभर टक्के आरोग्यवान व कार्यक्षम असावा लागतो नाहीतर सर्वांचा घात होतो. साखळीतला एक दुवा जर कच्चा राहिला तर सब साखळी निरुपयोगी ठरते; तीच गोष्ट क्रिकेटसारख्या येभरवशी खेळातील सघात घडून येते.

साधनें दुसऱ्याने वापरणे कोणत्याहि सामन्यात केव्हाहि ,श्रेयस्कर असत नाही म्हणून शक्य तो या बाबतीत अदलाबदल टाळावी.

हातमोजासंबधी हीच काळजी, यष्टिरक्षकानेहि नेहमी घेतली पाहिजे त्याने आपण वापरण्याचे मोजे स्वत निवडून, ते सायीचे व घट्ट बसणारे आहेत याची सामन्यापूर्वी खात्री करून घेणे अत्यत आवश्यक आहे या बाबतीत गलती झाल्याने आणीबाणीच्या लढतीत प्रबळ फलदाजाचा सोपा झेल सुटून सामना हातचा गमावल्याची अनेक उदाहरणे घडलेली आहेत तसेच जास्त मोठया व सैल पॅड घातल्याने, बॅट टोला मारताना ती पॅडमध्ये अडकून, फलदाज बाद झालेले आढळतील

आणखी एक सूचना केली पाहिजे सामन्यापूर्वीच्या व इतर वेळेच्या सरावात, चडू जेथे लागून इजा होण्याचा सभव असतो, ते सर्व शरिराचे अवयव- विशेषत नाजूक भाग- लगोट अगर नवीन बॉक्ससारखी निरनिराळी सरक्षणसाधने वापरून सुरक्षित ठेवणे हे प्रत्येक खेळाडूचे सघाबाबत कर्तव्य असते या बाबतीत दक्षता घेतली जाते किंवा नाही हे नेत्याने अवश्य पाहावे शाळा, कॉलेज व सामान्य क्लबातून कमालीचा निष्काळजीपणा असतो व नतर तीच सवय घातक ठरते

# खेळाचा पाया

## तन्दुरुस्ती

जशी एखादी मोठी इमारत बाहेरून कितीहि आकर्षक, उच्च, भव्य व उपयुक्त दिसत असली तरी तिचा पाया जर मजबूत नसेल तर, ती ज्याप्रमाणे केव्हा कोसळेल व दगा देईल याचा नेम नसतो, तीच स्थिति खेळातील पराक्रम, कौशल्य, धडाडी वगैरे आकर्षक गुणांची, शारीरिक तन्दुरुस्तीच्या अभावी होत असते शारीरिक आरोग्य (ज्याला आपण तन्दुरुस्ती म्हणतो) क्रिकेटसारख्या– एखादी क्षुल्लक लहानशी चूक खपवून न घेणाऱ्या खेळात किती आवश्यक आहे, हे सहज समजेल फलंदाज व क्षेत्ररक्षक यांच्या हातून आजाराने, दुबळेपणाने किंवा अनवधानाने एक जरी प्रमाद घडला, तरी प्रबळ प्रतिपक्षाला अचानक जीवदान मिळून, खेळाची गति उलटून, डाव अंगावर येतो अटीतटीच्या सामन्यात डोळ्यात तेल घालून तासानुतास पाहारा करताना प्रत्येक क्षेत्ररक्षक शंभर टक्के आरोग्यवान व कार्यक्षम असावा लागतो नाहीतर सर्वांचा घात होतो. साखळीतला एक दुवा जर कच्चा राहिला तर सर्व साखळी निरुपयोगी ठरते; तीच गोष्ट क्रिकेटसारख्या वेभरवशी खेळातील संघात घडून येते.













उत्तम आरोग्यासाठी जीवनसत्त्वयुक्त आहार अवश्य आहे.

क्रिकेटचा खेळ अवघड का आहे व त्यात अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे आरोग्य का पाहिजे याचे उत्तम विवेचन एका शास्त्रज्ञाने केले आहे. तुफानी गोलदाज, उदाहरणार्थ– जुना तुफानी गोलदाज 'लारवूड' किंवा हल्लीचा 'लिंडवॉल' यांचे भयंकर चेंडू एक्सप्रेस गाडीच्या वेगाने, म्हणजे ताशी सत्तर मैलांच्या वेगाने हल्ला करीत असतात, असे स्टॉपवॉचने वेळ मोजून काढले आहे, याचा अर्थ, अर्ध्या सेकंदात म्हणजे डोळ्यांची उघडझाप नीट होते न होते तोच तो तुफानी गोळा फलदाजावर चाल करून येतो. या निमिषार्धांत अंगावर चाल करणाऱ्या चेंडूची प्रतिबिंबें डोळ्यावर एकामागून एक पडत राहणें, त्याची जाणीव सारखी मेंदूला होत राहणें, मेंदूने अनेक मज्जातंतू (नर्व्ह) मार्फत हालचालीचे संदेश एकामागून एक हातापायास धाडणे व त्याची उत्तरे परत मेंदूकडे येणे वगैरे सर्व हालचाली, क्रिया व प्रतिक्रिया या निमिषार्धांत पण अचूक होणें, टोला नीट बसण्याला जरूर असतात. शरिराच्या एखाद्या अवयवाने, विशेषत हजारोपैकी एखाद्या संदेशवाहक 'नर्व्ह'ने जर चूक केली, तर फलदाजाला भलत्याच ठिकाणी चेंडू दिसेल व त्याचा त्रिफळा उडेल! शरिरातील एकूण एक लहानमोठ्या अनेक अवयवांची कामे अशी अत्यंत महत्त्वाची असल्याने, थोडीशीहि प्रकृति बिघडल्यास त्याचे व अर्थातच, डोळे, हात, पाय, मेंदू वगैरेचे नीट सहकार्य साधणार नाही व म्हणजे त्या फलदाजाला मुळीच यश लाभणार नाही. मनुष्य 'नर्व्हस' होतो याचा खरा अर्थ त्याच्या 'नर्व्हज्' आरोग्य बिघडल्याने नीट काम करीत नाहीत व तो भित्रा, चिडखोर अगर प्रक्षुब्ध होतो. शारीरिक स्वास्थ्याचा अगर तन्दुरुस्तीचा मनावरहि परिणाम होतो व म्हणून एका अर्थाने धैर्य, आत्मविश्वास, संयम व स्थैर्य हे मानसिक गुण असूनसुद्धा













उत्तम आरोग्यासाठी जीवनसत्त्वयुक्त आहार अवश्य आहे.

## दैनंदिन व्यायाम

उत्तम आरोग्य संपादण्यास नियमित आहार व विहार आवश्यक आहेत हे सांगणे नकोच. अग्नि जसा शुद्धिकारक म्हणजे सर्व दोष व घाणनाशक असतो, तसा भरपूर व्यायाम खाण्यापिण्यातले किरकोळ दोष व चुका सहज दूर करतो असा अनुभव आहे. मात्र असा व्यायाम मोकळ्या हवेत म्हणजे गावाबाहेर उघड्या मैदानावर जितका होईल तितका उत्तम. ऑक्सिजन अथवा प्राणवायूच्या सतत पुरवठ्याशिवाय कोणताहि प्राणी पांच मिनिटेंहि जिवंत राहू शकत नाही. जीवधारणेला आवश्यक जी रक्तशुद्धि ती प्राणवायु जितका जास्त मिळेल तितकी जास्त चांगली होईल व आरोग्य आणि उत्साह वाढेल हे स्पष्ट आहे. अर्थातच क्रिकेटचा मोसम ज्या वेळी बंद असेल त्या वेळी फूटबॉल, हॉकी, टेनिस यासारखे परकीय किंवा आट्यापाट्या, खो खो यासारखे स्वदेशी मैदानी खेळ नियमाने रोज खेळून शरीर कार्यक्षम ठेवणे अत्यंत जरूर आहे.


मोकळ्या हवेंत फिरण्याने प्राणवायूचा पुरवठा होतो


क्रिकेटचा मोसम नसेल त्या वेळीं इतर खेळ खेळून शरीर कार्यक्षम ठेवावें

### चापल्य

क्रिकेटमध्ये यशस्वी होण्यास ऐन वेळी चेंडूवर तडफेने तुटून पडणे



शारीरिक व्यायाम हा मैदानी खेळाचा पाया आहे.

आवश्यक असतें. खेळाडूच्या अंगात हरिणाचे चापल्य असल्याशिवाय, अवघड वेगवान चेंडू धावत जाऊन पकडणे, किंवा फलदाजी करीत असतांना तो वाटेल त्या दिशेस टोलावणे कधीच जमणार नाही. टोला बिनचूक व सफाईदार होण्यास, एक ठराविक क्षण फलदाजाला साधावा लागतो. निमिषमात्र जर उशीर झाला तर खेळाडूच्या अंगात बळ असूनसुद्धा टोल्यात ते उतरणार नाही किंवा टोला चुकेल. याचाच अर्थ, शक्तीचा पुरा उपयोग होण्यास युक्तीची म्हणजे चापल्याची व तडफेची आवश्यकता अतिशय असते. खेळात ज्याला 'टाइमिंग' म्हणतात ते हेच. ते नसल्यास मोठा पहेलवानसुद्धा, साध्या पण सराईत फलंदाजापेक्षा जास्त लांब व जोरकस टोला मारू शकणार नाही. शरीर चपळ होण्यास अॅथलेटिक्स, विशेषतः निरनिराळ्या लहान शर्यती व उड्या यांचा पुष्कळ उपयोग होतो व म्हणून अॅथलेटिक्स हा कोणत्याहि मैदानी खेळाचा पाया समजला पाहिजे व त्याला ऑलिंपिक सामन्यात महत्त्वाचे स्थान आहे.

## तीक्ष्ण नजर

या खेळात चेंडूच्या म्हणजेच तो फेकणाऱ्या, पाठलाग करणाऱ्या व टोलावणाऱ्या खेळाडूच्या हालचाली अत्यंत वेगाने, निमिषार्धात व्हावयाच्या असल्याने, त्या अचूक होण्यास तीक्ष्ण नजर अवश्य पाहिजे. उदाहरणार्थ— गोलंदाजाने फेकलेला वेगवान चेंडू, फलदाजाच्या बॅटीवर आदळून अगर टोलावला जाऊन तो बदललेल्या गतीने कोठेतरी जात असताना, प्रथमपासून हातात येईपर्यंत जर क्षेत्ररक्षकाला नीट दिसला, तरच तो त्याला बरोबर तळहाताच्या मध्यावर पेलून बिनचूक झेलता येईल. पाव इंचसुद्धा जरी तो बाजूला राहिला तरी हातातून पडेल; एवढेच नव्हे, तर बोटावर अगर इतरत्र आपटून खेळाडूस इजा होईल. हीच गोष्ट

फलदाजाची अगदी सूक्ष्म चूक झाली तरी होईल व चेंडू बॅटीच्या टोकाला लागून झेल उडेल

उत्तम व तीक्ष्ण नजरेची देणगी थोड्याफार प्रमाणात आनुवंशिक असेल पण कोणत्याहि निरोगी तरुणाला चांगल्या राहणीनें, सवयीनें व अभ्यासाने, तिची तीक्ष्णता व अचूकता कमावता येते मनुष्याच्या भावनाची, विचाराची, तशीच आरोग्याचीहि परीक्षा डोळ्यावरून होते, इतके डोळ्याचे महत्त्व आहे साध्या जागरणाने पडसे-खोकल्याने अगर डोके-दुखीने, डोळ्याच्या कामात व्यत्यय येतो व चेंडूचा वेग व दिशा याचा स्पष्ट अंदाज येत नाही चांगले भरवंशाचे क्षेत्ररक्षक कधीकधी सोपे झेल सोडतात त्याचे कारण तात्पुरते प्रकृतीचे अस्वास्थ्य असतें

## अभ्यास

खेळात उच्च दर्जाचे कौशल्य कमावण्यास अभ्यास व व्यासंग अवश्य पाहिजे मग नैसर्गिक गुण— उत्तम शरीरप्रकृति, आरोग्य, चपळता व तीक्ष्ण नजर जरी कमी असली, तरी चालतील सतत सरावाने अवघड गोष्टी आपोआप मंत्राप्रमाणे घडू लागतात नवख्या खेळाडूला चेंडूचा वेग व दिशा बरोबर न कळल्याने त्याचा टोला बरोबर लागत नाही पण सराइताला तो सहज साध्य होतो व चेंडू टोलावण्याच्या त्याच्या सर्व हालचाली आपोआप व बिनचूक पार पडतात शब्दवेध करणारे तिरंदाज डोळ्याच्या मदतीशिवाय, आवाजाच्या रोखाने अचूक नेम सरावाने मारू शकतात, हें आपण अनेकदा पाहतो नेहमी कोणतीहि गोष्ट करीत राहिल्याने ती अंगवळणी पडते व पाहिजे त्या वेळी व ठिकाणी सहज साध्य होते प्रत्येक

## चित्तस्थैर्य

वरील शारीरिक गुण, जर खेळाडूचे मन स्थिर व शांत नसेल, तर ते चुरशीच्या व निकराच्या लढ्यात ऐन वेळी निरुपयोगी ठरतात एकदम संकट पुढे उभे राहिले असता शरीर लुळे पडते, असा बहुतेकांना केव्हा ना केव्हातरी अनुभव आला असेल अशा वेळी प्रसंगावधान व धैर्य– ज्याला 'नव्हं' म्हणतात– ते जर नसेल तर शरिराची सर्व इंद्रियें सुस्थितीत असूनहि निरुपयोगी ठरतील, हात कापतील, पाय उचलले जाणार नाहीत, किंवा डोळयांना चेंडू स्पष्ट दिसणार नाही ! मोठ्या सामन्यात घबराटीने काय अनर्थ होतात व चांगले खेळाडू कसे भराभर बळी पडतात, याचे दृश्य अनेक वेळा दिसून आले आहे क्रिकेटसारख्या बेभरवशी खेळांत मनाच्या समतोलपणाला व आत्मविश्वासाला फार किंमत दिली पाहिजे मोठ्या सामन्यात फलदाजीला सुरवात करण्यापूर्वी प्रत्येक फलदाज थोडाफार प्रक्षुब्ध होतो पण ब्रॅडमन अशा वेळीहि शांत व स्थिर राही असे सांगतात, व हेंच त्याच्या अलौकिक यशाचे प्रमुख कारण असावे

हा नैसर्गिक घाबरटपणा घालविण्यास उत्तम उपाय म्हणजे जयापजयाविषयी बेफिकीर राहणे एखाद्या गोष्टीत चुरशीने लढणे व त्याच वेळी तिजविषयी उदासीन राहणे, ही मोठी अवघड कामगिरी अर्थातच आहे, पण तीहि अभ्यासाने व निश्चयाने साध्य होते 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु' हा गीतेचा उपदेश व 'Not triumph but struggle' हें ऑलिंपिक सामन्याचे ध्येय खेळातहि, आनंदाला, यशाला व प्रगतीला उपयोगी पडतात ज्याची ज्याला हाव असेल, त्यालाच पराजयाची भीति जास्त असते युद्धात भाग घेऊनहि जो मनाने अलिप्त अगर तटस्थ राहू शकेल, त्याला केव्हाहि घाबरण्याचे कारण नाही शिक्षकांनी विद्यार्थ्यांत ही तटस्थ वृत्ति रुजवण्याचा प्रयत्न अवश्य केला पाहिजे

गेल्या पिढीतल्या भारतीय मल्लांत पराजय म्हणजे मयंकर अपमान समजण्याची जी अनिष्ट रूढि होती, ती आता पार बदलून टाकली पाहिजे व तरुण खेळाडूंत विजयाचे व यशाचे अवास्तव स्तोम कमी केले

फलदाजाची अगदी सूक्ष्म चूक झाली तरी होईल व चेंडू बॅटीच्या टोकाला लागून झेल उडेल

उत्तम व तीक्ष्ण नजरेची देणगी थोड्याफार प्रमाणात आनुवंशिक असेल पण कोणत्याहि निरोगी तरुणाला चांगल्या राहणीने सवयीने व अभ्यासाने, तिची तीक्ष्णता व अचूकता कमावता येते मनुष्याच्या भावनांची, विचारांची, तशीच आरोग्याचीहि परीक्षा डोळ्यावरून होते, इतकें डोळ्याचें महत्त्व आहे साध्या जागरणाने, पडसं-खोकल्याने अगर डोकेदुखीने, डोळ्याच्या कामात व्यत्यय येतो व चेंडूचा वेग व दिशा याचा स्पष्ट अंदाज येत नाही चांगले भरवशाचे क्षेत्ररक्षक कधीकधी सोपे झेल सोडतात त्याचे कारण तात्पुरते प्रकृतीचे अस्वास्थ्य असतें

## अभ्यास

खेळात उच्च दर्जाचे कौशल्य कमावण्यास अभ्यास व व्यासंग अवश्य पाहिजे मग नैसर्गिक गुण— उत्तम शरीरप्रकृति, आरोग्य, चपळता व तीक्ष्ण नजर जरी कमी असली, तरी चालतील सतत सरावाने अवघड गोष्टी आपोआप यंत्राप्रमाणे घडू लागतात नवख्या खेळाडूला चेंडूचा वेग व दिशा बरोबर न कळल्याने त्याचा टोला बरोबर लागत नाही पण सराइताला तो सहज साध्य होतो व चेंडू टोलावण्याच्या त्याच्या सर्व हालचाली आपोआप व बिनचूक पार पडतात शब्दवेध करणारे तिरंदाज डोळ्याच्या मदतीशिवाय, आवाजाच्या रोखाने अचूक नेम सरावाने मारू शकतात, हें आपण अनेकदा पाहतो नेहमी कोणतीहि गोष्ट करीत राहिल्याने ती अंगवळणी पडते व पाहिजे त्या वेळी व ठिकाणी सहज साध्य होते प्रत्येक चांगला फलदाजसुद्धा दर डावात सुरवातीचे चेंडू अडवताना थोडा गडबडतो व पाच मिनिटें टिकून सराईत व स्थिर झाल्यावरोबर वाटेल तसे टोले मारू शकतो, हे सर्वांच्या परिचयाचे आहे म्हणून चांगला खेळाडू बाद होण्याचा थोडा तरी संभव जर असेल तर तो सुरवातीसच थोड्या वेळच्या अभ्यासाने जर एवढा महत्त्वाचा परिणाम खेळावर होऊ शकतो, तर दीर्घकालीन प्रयत्नांनी तो केवढी मजल मारील, याची सहज कल्पना येईल

## चित्तस्थैर्य

वरील शारीरिक गुण, जर खेळाडूचे मन स्थिर व शांत नसेल, तर ते चुरशीच्या व निकराच्या लढ्यात ऐन वेळी निरुपयोगी ठरतात एकदम संकट पुढे उभे राहिले असता शरीर लुळे पडते, असा बहुतेकांना केव्हा ना केव्हातरी अनुभव आला असेल अशा वेळी प्रसंगावधान व धैर्य– ज्याला 'नव्हं' म्हणतात– ते जर नसेल तर शरिराची सर्व इंद्रियें सुस्थितीत असूनहि निरुपयोगी ठरतील, हात कापतील, पाय उचलले जाणार नाहीत, किंवा डोळ्यांना चेंडू स्पष्ट दिसणार नाही ! मोठ्या सामन्यात घबराटीने काय अनर्थ होतात व चांगले खेळाडू कसे भराभर बळी पडतात, याचे दृश्य अनेक वेळा दिसून आले आहे क्रिकेटसारख्या बेभरवशी खेळात मनाच्या समतोलपणाला व आत्मविश्वासाला फार किंमत दिली पाहिजे मोठ्या सामन्यात फलदाजीला सुरवात करण्यापूर्वी प्रत्येक फलदाज थोडाफार प्रक्षुब्ध होतो पण ब्रॅडमन अशा वेळीहि शांत व स्थिर राही असे सांगतात, व हेच त्याच्या अलौकिक यशाचे प्रमुख कारण असावे

ह्या नैसर्गिक घाबरटपणा घालविण्यास उत्तम उपाय म्हणजे जयापजयाविषयी बेफिकीर राहणे एखाद्या गोष्टीत चुरशीने लढणे व त्याच वेळी तिजविषयी उदासीन राहणे, ही मोठी अवघड कामगिरी अर्थातच आहे पण तीहि अभ्यासाने व निश्चयाने साध्य होते 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु' हा गीतेचा उपदेश व 'Not triumph but struggle' हे ऑलिंपिक सामन्याचे ध्येय खेळातहि आनंदाला, यशाला व प्रगतीला उपयोगी पडतात जयाची ज्याला हाव असेल, त्यालाच पराजयाची भीति जास्त असते युद्धात भाग घेऊनहि जो मनाने अलिप्त अगर तटस्थ राहू शकेल त्याला केव्हाहि घाबरण्याचे कारण नाही शिक्षकांनी विद्यार्थ्यांत ही तटस्थ वृत्ति रुजवण्याचा प्रयत्न अवश्य केला पाहिजे

गेल्या पिढीतल्या भारतीय मल्लांत पराजय म्हणजे मयवर अपमान समजण्याची जी अनिष्ट रूढि होती, ती आता पार बदलून टाकली पाहिजे व तरुण खेळाडूत विजयाचे व यशाचे अवास्तव स्तोम कमी केले

पाहिजे; तरच सर्व तऱ्हेचे खेळ जास्त आकर्षक, जोरकस व तडफदार होण्यास मदत होईल; एवढेंच नव्हे, तर खेळापासून खरा आनंद– जो हल्ली जयापजयाच्या काळजीमुळे लाभत नाही– तो पदरात पडेल.

## संघशक्ति

हे झाले वैयक्तिक गुण पण सांघिक खेळात एक व्यक्ति चांगली असून भागत नाही साखळीचे सामर्थ्य जसे तिच्या सर्वात कच्च्या दुव्या-इतकेच ठरते, तीच गोष्ट कोणत्याहि लोकसमूहाची व संघाची दिसेल. याकरिता प्रत्येकाने आपले काम वेळेवर नीट पार पाडले पाहिजे. ब्रॅडमन-सारख्याचा एक जरी झेल, क्षेत्ररक्षकाने निष्काळजीपणे चुकून सोडला, तरी सामना त्याच क्षणी हातचा गेला असे म्हणावे लागेल मोठया यंत्रातले एक लहान चाक जरी थांबले तरी सर्वच यंत्र बंद पडेल तीच अवस्था संघाची होते संघभावना उत्पन्न होण्यास प्रथम स्वार्थत्यागाची बैठक पाहिजे. शिस्त म्हणजेच त्याग संघाकरिता खेळाडूने आपले स्वत्व विसरले पाहिजे, तरच सर्वांचे खरे सहकार्य मिळून, संघ प्रबळ होईल. 'वॉटर्लूची लढाई आम्ही क्रिकेटच्या मैदानावर जिंकली' असे जे इंग्रज अभिमानाने म्हणतात ते, याच खेळातून निर्मलेल्या संघशक्तीवर रास्त झाले.

★ ★ ★

# क्षेत्ररक्षण ( *Fielding* )

## क्षेत्ररक्षणाचें आत्यंतिक महत्त्व

फलदाजी, गोलदाजी व क्षेत्ररक्षण या क्रिकेटच्या तीन शाखा सारख्याच महत्त्वाच्या असल्या, तरी कोणत्याहि लहानमोठ्या सामन्यात व कोणत्याहि परिस्थितीत, क्षेत्ररक्षण हें संघातील सर्वांनी मिळून, एकजुटीने पार पाडण्याचे प्रमुख कर्तव्य असल्याने त्याला साहजिकच जास्त महत्त्व दिले पाहिजे फलदाजी एका वेळेला दोघे व गोलदाजी फक्त एकच खेळाडू करू शकतो; त्यामुळे थोडी ढिलाई झाली, तरी तिचा परिणाम सर्व संघावर एकदम घातक ठरत नाही पण क्षेत्ररक्षणाचा व्यूह युद्धात सर्वांनी मिळून रचणे जरूर असल्याने, एकाची चूक सर्वांना बाधक ठरते, एवढेंच नव्हे, तर संसर्गजन्य रोगाप्रमाणे त्याची ढिलाई इतरात पसरते, सर्वांचा उत्साह मावळतो व एकामागून एक सोपे झेल सुटू लागल्याचे दृश्य क्रीडांगणावर टेस्ट सामन्यातहि अनेक वेळी दिसू लागते याच्या उलट चलाख क्षेत्रिकाने आपलें काम चोख बजावल्याने उत्साहाचे वातावरण निर्माण होऊन अवघड झेलसुद्धा पकडले जातात व प्रथम दुर्बल वाटणारा संघ शेवटी प्रबळ ठरतो मरवडाचे फलदाजहि सुरवातीस अस्थिर असल्याने

हलक्या दर्जाचे आहे, असा गरसमज केवळ प्रेक्षकातच नाही, तर खेळाडू-तहि दिसून येतो अशा परिस्थितीत क्षेत्ररक्षणात कोणी विशेष मेहनत घेत नाहीत याचे आश्चर्य वाटावयास नको ही परिस्थिति व उपेक्षा नाहीशी होण्याचा एकच उपाय व तो म्हणजे संघाची निवड करताना, खेळाडू इतर सर्व बाजूनी व गुणानी कितीहि चागला असला, तरी जर तो क्षेत्ररक्षणात चुकार, दुर्बळ व निरुत्साही असेल तर, त्याला कटाक्षाने वगळले पाहिजे व सघात प्रवेशासाठी या शाखेत तत्परता व चपळता हाच एकमेव परवाना झाला पाहिजे

## उपयुक्तता

उत्कृष्ट क्षेत्ररक्षकाचे गुण व कामगिरी खालीलप्रमाणे सिद्ध करता येईल —

( १ ) इतर शाखातील कमकुवतपणा व तूट त्याच्या तयारीने भरून निघते सामान्य गोलदाजीसुद्धा, झेल पकडले गेल्यास व टोले वारवार अडवले गेल्यास प्रभावी ठरते तसेच एखादा खेळाडू कमनशिबाने फलदाजीत लवकर बळी पडल्यास तो झालेली स्वसघाची हानि, प्रतिपक्षाच्या धावा अडवून आपल्या उत्कृष्ट क्षेत्ररक्षणाने भरून काढू शकतो सामना जिंकण्याच्या दृष्टीने आपण स्वत धावा काढल्या काय, किंवा शत्रूच्या कमी केल्या काय, दोन्ही मार्ग सारखेच उपयुक्त ठरतात यश ही शेवटी मिळकतच ठरते

( २ ) चपळ रक्षक प्रतिपक्षाची चढाई मोडून काढतात व त्याच्या फलदाजाना दुर्बळ व नाउमेद करतात त्याचा परिणाम म्हणजे प्रतिपक्षी कोंडले जाऊन त्याना भलतें साहस पत्करून आत्मनाश सोसावा लागतो

( ३ ) उत्तम गोलदाजी व फलदाजी कष्टसाध्य असते व त्यासाठी काही नैसर्गिक गुण लागतात, पण क्षेत्ररक्षण त्या मानाने सोपें व सहजसाध्य असल्याने होतकरू तरुणाना सघात प्रथम प्रवेश व सधि मिळवून देण्याला ते फार उपयोगी पडते

## कर्तव्यें

चागल्या रक्षकाकडून काय अपेक्षा असतात तें पाहणे बोधप्रद ठरेल —

( १ ) तो शिस्तवार, आशादायक व उत्साही सैनिक असला पाहिजे व नेत्याकडे त्याची सतत दृष्टि पाहिजे नाहीतर शत्रूला नवळत, नेत्या-

कडून सूचना त्याला घेता येणार नाहीत व योजलेले डावपेच शत्रूला कळून वाया जातील घड्याळातील यंत्राप्रमाणे त्याच्या हालचाली वेळेवर व बिनचूक झाल्या पाहिजेत.

( २ ) आपल्या कामात त्याला आनंद वाटला पाहिजे. तरच तासा-न्तुतास करावे लागणारे, त्रासाचे व कंटाळवाणे पहारेकऱ्याचे काम त्याच्या हातून नीट होईल प्रेक्षकाचे लक्ष क्रीडांगणावर फलदाज व गोलदाज याच्या कडे नेहमी असते क्षेत्ररक्षक अनेक असल्याने, बाजूस पडतात व त्याच्या गुणाचे चीज होत नाही अशा वेळी, क्षेत्ररक्षणाची खरी आवड असल्या-शिवाय क्षेत्ररक्षक आपला सर्व उत्साह आपल्या कामात ओतणार नाही

( ३ ) शारीरिक व मानसिक उत्साह ही पहिली कसोटी आहे त्या-मुळेच खरी चपळता अंगात येते उत्तम आरोग्य, नियमित व्यायाम व मेहनत हे सर्वांचा पाया आहेत चपळता येण्यास ऊष्ण हवा जास्त अनुकूल असते त्यामुळे इंग्लंडपेक्षा ऑस्ट्रेलियन, वेस्ट इंडियन व भारतीय हवामान उत्तम क्षेत्ररक्षक तयार करण्याला सोयीचे वाटते कडक थंडीमुळे शरीरा-तील लवचिकपणा कमी होतो व स्नायू लचकण्याचे व दुखावण्याचे भय जास्त असते असा अनुभव आहे ऊष्ण देशातील प्राणी सर्वसाधारणपणे लहान पण चपळ, उलट थंडीत वाढणारे जाडजूड पण बोजड असतात तरीपण अभ्यास व मेहनत हवामानावर विजय मिळवू शकतात

( ४ ) चांगल्या रक्षकाला चेंडूच्या गतीचा, उंचीचा व दिशेचा बरोबर अंदाज करता आला पाहिजे याला च 'बॉलसेन्स' म्हणतात व सर्व चेंडूच्या खेळात त्याला अग्रस्थान द्यावं लागते चेंडू कोणत्या दिशेने टोलावला जाईल, त्याचा वेग किती, तो कसा वळेल व उडेल, तसेच कोणता फलदाज कोण या वुइकेटकडे धावेल याचा अचूक अंदाज चेंडू अडवून व फेकून प्रतिपक्षास धावबाद करण्यास अत्यंत आवश्यक आहे इतरापेक्षा लवकर चेंडूवर तुटून पडण्यास त्याला परिस्थितीचा नीट अचूक अंदाज आला पाहिजे

( ५ ) कित्येक वेळी टोले भयंकर वेगाने, व अचानक क्षेत्ररक्षकाच्या अंगावर येत असतात अशा वेळी तो झेल अचूक पकडण्यास चित्ताची व




क्षेत्ररक्षकाच्या शक्य त्या सर्व जागा, नावे व व्यूह दाखविणारा नकाशा.
( मैदान साधारणपणे १५० यार्ड लांब आणि तितकेच रुंद असते पण नियमांनी त्यास बंधन घातलेले नाही परिस्थितीप्रमाणे १६० यार्डापेक्षा कमी व २०० यार्डापेक्षा जास्त रुंदी व लांबी असू नये अशी प्रथा आहे )

कि ४

लाँग लेग

थर्ड स्लिप

यष्टिरक्षक

पॉइंट

कव्हर

एक्स्ट्रा कव्हर

मिड ऑन

मिड ऑफ

गोलंदाज

लाँग ऑफ

लाँग ऑन

मंद गोलंदाजासाठी क्षेत्ररक्षणाचा ( सर्वसाधारण ) व्यूह

नजरेची एकाग्रता असावी लागते. कित्येकदा रक्षकाला सतत दोनतीन तास पहारा करावा लागतो. 'सब ठीक' म्हणून तो अशा वेळी थोडा विसावा घेऊ पाहतो, इतक्यात झेल येऊन पडतो व अर्थातच सुटतो. 'स्लिप'चे सोपे झेलहि अनेक वेळी असाच अनवधानाने गुल्लात




तीव्र गोलंदाजासाठी क्षेत्ररक्षणाचा सामान्य व्यूह

पकडण्याची चेंडू फारच बाजूला व वेगात असल्यासच एकाच पायाने तो अडविणे, अगर एकाच हाताने झेलण्याचा प्रयत्न करणे अपवाद म्हणून क्षम्य होईल दिखाव्याकरिता ऐटीत एका हाताने झेल पकडणे चुरशीच्या सामन्यात घातक ठरतं. आपल्याजवळच्या सोंगड्याच्या दिशेने जोरात आलेले टोले कदाचित् त्याच्या हातून सुटले तर ते अडवण्यास प्रत्येकाने तयारीत असावे लागते त्याकरिता एकमेकाकडे नेहमी लक्ष पाहिजे या बाबतीत जे दक्ष असतील ते ऐन वेळी स्वपक्षीयास मदतच करतील व व्यत्यय आणणार नाहीत बेफिकीरीच्या गोंधळाने उंच गेलेला झेल झेलताना, दोघांची टक्कर होऊन अगर परस्पराचा अडथळा होऊन चेंडू खाली पडण्याचा हास्यास्पद प्रकार आपण पुष्कळदा पाहतो सर्व क्षेत्ररक्षक सावध असतील तर असले अपघात होणार नाहीत



## क्षेत्ररक्षकांचे तीन वर्ग

सर्व रक्षकांना जरी एकाच तऱ्हेचें काम व नियम असले तरी विवक्षित जागांमुळे त्यांचे तीन प्रकार व वर्ग संभवतात ते असे — (१) यष्टीजवळचे, (२) मधले, व (३) दूरचे प्रत्येकाला काही वेगळ्या प्रकारची कामगिरी करावी लागते व वेगळे गुण संपादावे लागतात

(१) पहिला वर्ग– हा वर्ग झेल पकडून चढाई कर-

मी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेज संघातून खेळत असताना अशा तऱ्हेचा एक गंभीर अपघात मला अजूनहि आठवतो. आमच्या संघात 'जोशी' आडनांवाचे दोन बऱ्यापैकी खेळाडू होते. पण दोघांतहि आवेश जास्त व अवधान कमी असल्याने, एकदा दोघांमध्ये उंच उडालेला झेल पकडण्यास एकमेकास कोणतीहि सूचना न देता दोघेहि आधळ्यासारखे एकाच ठिकाणी वेगाने धावून आले त्याचा परिणाम म्हणजे चेंडू



चेंडू असा थोपवावा.



चेंडू यष्टिरक्षकाकडे फेकतांनाचा पवित्रा.

## क्षेत्ररक्षकांचे तीन वर्ग

सर्व रक्षकांना जरी एकाच तऱ्हेचें काम व नियम असले तरी विविक्षित जागांमुळे त्यांचे तीन प्रकार व वर्ग संभवतात. ते असे :— (१) यष्टीजवळचे, (२) मधले, व (३) दूरचे. प्रत्येकाला काही वेगळ्या प्रकारची कामगिरी करावी लागते व वेगळे गुण संपादावे लागतात.

(१) पहिला वर्ग— हा वर्ग, झेल पकडून चढाई करण्याकरिता योजलेला असतो. 'ऑफस्लिप, गली, सिली मिडऑफ ( फलंदाजाच्या तोंडासमोर धोक्यात म्हणून कधीकधी गोंधळलेला =' सिली' ), तसेच लेगस्लिप, फाइन व शॉर्टलेग, शॉर्टस्क्वेअर लेग, सिली मिडऑन, असा रक्षकांचें वाटोळे चक्रव्यूहानें कडें फलंदाजाला अडवून व गोंधळून टाकण्याला आवळलें जातें ( क्षेत्ररक्षकाचा व्यूह पाहा, पान ४९.) अर्थातच हे आक्रमक

धीर धाडसी, चपळ व गरुडदृष्टीचे असावे लागतात तोंडावर ठेवलेले असे रक्षक किती धोक्यात असतात याचे प्रत्यक्ष उदाहरण १९४८ च्या अँग्लो-ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये, ऑस्ट्रेलियन 'सिली मिडऑन' रक्षक 'बार्न्स' हा फलदाज 'पोलार्ड'चा टोला पोटावर बसून भयंकर जखमी झाला, त्या वेळी स्पष्ट दिसून आले हे सर्व रक्षक दक्ष व कुशल असले, तर नव्या चेंडूच्या माऱ्याने भराभर बळी घेऊ शकतात गोलंदाजांनी या जागांचा विशेष अभ्यास केल्यास, त्यांना फलदाजावर वचक बसवता येतो व प्रतिपक्षीयांच्या दोषांचे जवळून निरीक्षण करता येते झेल अचूक पकडण्यास या जवळच्या रक्षकांनी आपली नजर कोठे एकाग्र करावी असा प्रश्न येतो काहीजण चेंडूवर स्थिर करतात, पण चांगली पद्धत म्हणजे फलदाजाच्या बॅटीवर सतत नजर असावी, म्हणजे टोल्याची दिशा, वेग व फिरत चटकन कळेल कारण बंदुकीतून जशी गोळी बाहेर पडते, तसा बॅटीतून चेंडू वेगाने बाहेर पडल्यासारखा वाटतो चक्रव्यूहातल्या या सर्वांनी वाकून उभें राहून हात पुढे पसरून तत्परतेने एकाग्र होऊन तयार असले पाहिजे झेल केव्हा व कसा येईल याचा बिलकुल नेम असत नाही, व गाफील राहिल्याने चूक होते, एवढेंच नव्हे तर धोका उत्पन्न होतो असा अनुभव आहे

पिछाडीस मदतनीस असल्याने, कच्चे व कमी चपळ रक्षक तेथे चालू शकतात. तरीपण झेलण्याचें कौशल्य केव्हाहि व कोठेहि उत्कृष्ट पाहिजेच.

(३) तिसरा वर्ग– दूरस्थांचा (डीप) बनलेला असतो; व ते सर्वजण मिळून बाहेरील व्यूह (चेंडू सीमापार न होईल यासाठी) रचीत असतात. यष्टीच्या मागे 'थर्डमॅन', 'बॅकस्टॉप', 'लाँगलेग', 'डीपफाइन' किंवा स्क्वेअर लेग व पुढे 'एक्स्ट्रॉ कव्हर' किंवा 'डीप एक्स्ट्रॉ कव्हर,' 'लाँग ऑफ व ऑन' असे निरनिराळ्या गोलंदाजीच्या प्रसंगानुरूप ठेवले जातात मंद गोलंदाजी असल्यास यष्टयासमोर जोराचे टोले जास्त संभवतात व म्हणून डाव्या व उजव्या बाजूस चारपांच रक्षक सीमेजवळ पहारा करीत ठेवावे लागतात धावणे, चेंडू अडवणें, झेलणें व लांब अचूक फेकणें या शिवाय हे सर्व तरबेज पाहिजेतच. शिवाय त्यांना मोठें क्षेत्र सांभाळणे असल्याने, दमदारपणा व चिकाटी जोडीला हवी. या कामाकरिता अर्थातच तरुण, चपळ, उंच व उत्साही वीर जास्त पसंत होतात.

त्यांची खरी कसोटी म्हणजे दूर टोलावलेल्या चेंडूवर ते सहसा एकापेक्षा जास्त धावा काढूं देत नाहीत; इतक्या वेगाने ते चेंडूवर धावून जातात व पळतानाच चेंडू उचलून तो लगेच वेगाने यष्टीवर फेकतात, की दुसरी धाव घोक्याची ठरते. या जागी उंच आलेला झेल पकडण्यास पाय जलद, हात स्थिर, नजर तीक्ष्ण व चित्त शांत असावे लागते. कित्येक वेळी सूर्य नेमका डोळ्यावर आल्याने ही कामगिरी फार अवघड असते. गोंधळून दोन रक्षक एकाच वेळी झेलाकडे धावतात व त्यांची ऐन वेळी टक्कर होऊन झेल सुटतो. अशा वेळी प्रसंगावधान राखून, ज्याला झेल जवळ व सोपा असेल त्याने ओरडून दुसऱ्याला इशारा दिला पाहिजे. अशा दुरून आलेल्या झेलासाठी एकदम पुढे धावू नये. प्रथम टोल्याच्या उंचीचा व वेगाचा अंदाज घेऊन मग हालचाल सुरू करावी. कारण पुढे धावून जाणे सोपें असतें; पण मागे जाणे मुळीच असत नाही; व झेल मागे गेल्याने अशा वेळी दुर्दशा

पुढे होईलसें वाटत नाही, इतकें त्याचें काम अवघड असते. तरीपण चांगल्या प्रकारचें यश मिळविण्यास त्याने खालील सूचना अमलात आणणे अवश्य आहे:—

( १ ) संघातील सर्व गोलंदाजांच्या फेकींचा व पद्धतींचा त्याने अभ्यास व सराव करावा आणि काही पूर्वसंकेत व खुणा ठरवून ठेवाव्या। निकराच्या युद्धात असे डावपेंच यशस्वी होतात प्रतिपक्षाला कसा व केव्हा हल्ला होणार हें कळणा उपयोगी नाही

( २ ) मध्यम व मंद गोलंदाजांसाठी त्याने जवळ, पण तुफानी माऱ्याच्या वेळी बऱ्याच अंतरावर राहणे श्रेयस्कर असते या बाबतीत अर्धवटपणा घातक ठरतो झेल पकडणे किंवा यष्टिवाद करणे यापैकी कोणतेंहि कार्य मधल्या जागी अर्धवटपणे साधत नाही मात्र फलंदाज रेषेपुढे जात असेल तर त्याने जवळ राहिले पाहिजे व त्यास बाद करण्यास तयार राहिले पाहिजे.

( ३ ) कोणत्याहि जागी व प्रसंगी त्याने वाकून, यष्ट्यांच्या रुवीवर नजर रोखून अत्यंत सावध राहिलें पाहिजे

( ४ ) तो मागे उभा असला तरी प्रत्येक धाव होताना, त्याने यष्टीजवळ धावत जाऊन क्षेत्ररक्षकाने फेकलेले चेंडू घेण्यास तत्पर असावें; त्याशिवाय शत्रूला धावबाद करता येणार नाही

( ५ ) त्याने गोलंदाजाचा चेंडू पकडण्याची घाई करू नये किंवा यष्टीपुढे हात केव्हाहि नेऊ नये तसें करून यष्टिवाद करणे नियमाच्या विरुद्ध आहे हे त्याने नेहमी ध्यानात ठेवावे

( ६ ) त्याचें खरें कौशल्य, लेग बाजूचे चेंडू झेलून, शक्य तर फलंदाजाला बाद करण्यात दिसून येते मात्र अशा वेळी त्याने भलते साहस पत्करून जिवा करून घेऊ नये संघात ऐन वेळीं त्याच्या बदली राखीव खेळाडूला तें काम द्यावे लागते व संघात तें नीट सभाळणारा कोणी बहुतेक नसतो हे नेहमी लक्षात ठेवावे

( ७ ) फलंदाजाचे व गोलंदाजाचे गुणदोष व डावपेच, तसेच प्रतिक्षणी बदलत जाणाऱ्या हिरवळीची परिस्थिति वगैरे सर्व महत्त्वाच्या गोष्टी

उडते उंचावरून येणारा झेल कोठे पडणार हे नीट स्थिरपणे अदाज घेऊन ठरविल्यावर, शक्य तर, तो छातीजवळ तळहाताचा पेला बनवून त्यात झेलावा असे केल्याने चेंडू जरी हातातून बाहेर कदाचित उडाला तरी पुन्हा लगेच पकडता येतो सर्वच चेंडू पकडताना व झेलताना तो दणक्याने उडून बाहेर जाऊ नये म्हणून त्यासह हात थोडे माग घेणे अवश्य असते पक्षी जाळ्यात पकडण्यापूर्वी आपण त्याला चुचकारतो तशातलाच हा प्रकार आहे चेंडू जितका जोरात तितके कमीजास्त चुचकारणे श्रेयस्कर असते यष्टिरक्षकाला तर या युक्तीचा पदोपदी अवलंब करावा लागतो थर्ड मॅन व लाँग लेग ' याना एक कटु अनुभव नेहमी येत राहतो मारलेला टोला प्रथम त्याच्या रोखान येतोसा वाटतो, पण चेंडू, मूळच्या गतीमुळे एकदम थर्डमनच्या डावीकडे व लाँग लेगच्या उजवीकडे जमिनीवर पडल्याबरोबर वळतो त्यामुळे हुलकावणी बसून चेंडू भलतीकडे गल्याने रक्षकाची हास्यास्पद स्थिति होते फिरक्या गोलंदाजीवर टोले अडवताना इतर क्षेत्रातहि असाच अनुभव लहान प्रमाणावर कित्येकदा येत असतो व त्याकरिता प्रयत्नाने दक्ष राहावे लागते

## यष्टिरक्षण

चाकाला जसा आस, तसा सर्व क्षेत्राला व व्यूहाला यष्टिरक्षक हा मध्यवर्ति म्हणून महत्त्वाचा असतो व बँकेच्या कॅशर प्रमाणे बहुतेक सर्व चेंडूची देवाण घेवाण त्याच्यामार्फत होत असते अर्थातच त्याचे काम फार जोखमीचे त्रासाचे व महत्त्वाचे असते ही जबाबदारी पत्करणारे वीर नेहमीच थोडे निघतात त्याचे दुसरे कारण म्हणजे फलंदाज व गोलंदाजाप्रमाणे त्याच्या गुणाचे व कामगिरीचे कौतुक व चीज साधारणपणे होत नाही सर्व काळ सिद्ध राहून, प्रत्येक चेंडू डोळ्यात तेल घालून झेलण्याचे कष्ट पडत असल्याने थकून, त्याच्या हातून चुका होणारच शिवाय कित्येक वेळा तुफानी गोलंदाज लेग बाजूकडे भरमसाट मारा करून यष्टिरक्षकाला धोक्यात घालतात या सर्व आपत्तीमुळे सर्वांचे समाधान सर्व वेळी ज्याने केले आहे असा यष्टिरक्षक अजून निर्माण झालेला नाही व

पुढे होईलसे वाटत नाही, इतके त्याचे काम अवघड असते तरीपण चांगल्या प्रकारचे यश मिळविण्यास त्याने खालील सूचना अमलात आणणे अवश्य आहे –

( १ ) संघातील सर्व गोलंदाजांच्या फेकीचा व पद्धतीचा त्याने अभ्यास व सराव करावा आणि काही पूर्वसंकेत व खुणा ठरवून ठेवाव्या ! निकराच्या युद्धात असे डावपेच यशस्वी होतात प्रतिपक्षाला कसा व केव्हा हल्ला होणार हे कळता उपयोगी नाही

( २ ) मध्यम व मंद गोलंदाजासाठी त्याने जवळ, पण तुफानी माऱ्याच्या वेळी बऱ्याच अंतरावर राहणे श्रेयस्कर असते या बाबतीत अर्धवटपणा घातक ठरतो झेल पकडणे किंवा यष्टिवाद करणे यापैकी कोणतेहि कार्य मधल्या जागी अर्धवटपणे साधत नाही मात्र फलंदाज रेषेपुढे जात असेल तर त्याने जवळ राहिले पाहिजे व त्यास बाद करण्यास तयार राहिले पाहिजे

( ३ ) कोणत्याहि जागी व प्रसंगी त्याने वाकून, यष्ट्यांच्या उंचीवर नजर रोखून अत्यंत सावध राहिले पाहिजे

( ४ ) तो मागे उभा असला तरी प्रत्येक धाव होताना, त्याने यष्टीजवळ धावत जाऊन क्षेत्ररक्षकाने फेकलेले चेंडू घेण्यास तत्पर असावे, त्याशिवाय शत्रूला धावबाद करता येणार नाही

( ५ ) त्याने गोलंदाजाचा चेंडू पकडण्याची घाई करू नये किंवा यष्टीपुढे हात केव्हाहि नेऊ नये तसे करून यष्टिवाद करणे नियमाच्या विरुद्ध आहे हे त्याने नेहमी ध्यानात ठेवावे

( ६ ) त्याचे खरे कौशल्य, लेग बाजूचे चेंडू झेलून, शक्य तर फलंदाजाला बाद करण्यात दिसून येते मात्र अशा वेळी त्याने भलतें साहस पत्करून अजिजा करून घेऊ नये सघात ऐन वेळी त्याच्या वदली राखीव खेळाडूला ते काम द्यावे लागते व संघात ते नीट सभाळणारा कोणी बहुतेक नसतो हे नेहमी लक्षात ठेवावे

( ७ ) फलंदाजाचे व गोलंदाजाचे गुणदोष व डावपेच, तसेच प्रतिक्षणी बदलत जाणाऱ्या हिरवळीची परिस्थिति वगैरे सर्व महत्त्वाच्या गोष्टी

यष्टिरक्षकाला जितक्या जवळून व सूक्ष्मपणे पाहता येतात तितक्या इतराना शक्य नसते म्हणून या जागेसाठी नेत्याची जर तयारी व अभ्यास असेल तर उत्तम या जागेवरून तो सर्वांवर उत्तम नजर ठेवू शकतो

( ८ ) तो केवळ यष्टिरक्षक नसून, सधाची नीति व सभ्यता याचाहि रक्षक असतो. फलदाजाला त्रास होईल असे हावभाव, आरडा-ओरड, पचाना व्यर्थ विचारणा व यष्टीची चाळवाचाळव त्याने कधीहि करू नये पचाच्या डोळयात धूळ टाकण्याची व सर्वांना चकविण्याची सधि त्याला जितकी असते तितकी इतराना असत नाही. या बाबतीत सचोटीने वागणारा यष्टिरक्षक खरा खेळाडू असला पाहिजे.

## भारतीय क्षेत्ररक्षणांत सुधारणा

भारतीय खेळाडू जागतिक स्पर्धेत या क्षेत्रात बरेच कच्चे ठरले आहेत या कमकुवतपणाचा दोष निवड समिति, स्वत प्रमुख खेळाडू व सार्वजनिक उपेक्षा याकडे जाईल प्रत्येक खेळाडूची लाब व उच उडी व धावण्याचा व चेंडू फेकण्याचा वेग ठराविक मर्यादेच्या खाली असता उपयोगी नाही, असा दडक- निवड समितीने घातला पाहिजे. उत्तम क्षेत्ररक्षकाचे गुण कमावण्यास, प्रत्येक क्रिकेटपटूने, इतर कांही मैदानी खेळ, तसेच तरतरी व तन्दुरुस्तीस पोषक असे व्यायाम, सतत वर्षभर घण श्रेयस्कर ठरेल उत्तम, साफ व हिरवीगार मैदानें तयार ठवण्यानेहि, क्षेत्ररक्षण सुधारण्यास व तरुणाचे मन त्याकडे आकर्षित करण्यास मदत होते. वाईट व धोक्याच्या मैदानावर खेळण्याने, जी एकदा भीति युवकाच्या मनात भरते, ती पुढे दूर होत नाही चागली मैदानें निर्माण करणे हा क्षेत्ररक्षणसुधारणेच्या कार्यक्रमातला पहिला व महत्त्वाचा भाग समजला गेला पाहिजे व त्याला सर्व लहानमोठ्या क्रीडा-सस्थानी हातभार लावला पाहिजे तरच उत्कृष्ट खेळाचा पाया घातल्याचे श्रेय लाभेल

★ ★ ★

उत्तम गोलदाज फारच थोड पुढ येण्याचे आणखीहि एक कारण म्हणजे त्या कामात फल्दाजीइतके आकर्षण खेळाडूना व प्रेक्षकानाहि वाटत नाही अर्थातच फलदाजीकडेच बहुसंख्य तरुण प्रथमपासून वळतात व गोल्दाजीची उपेक्षा होते भारतीय संघ या बाजूत किती कमकुवत आह ह विनू मानकडशिवाय दुसरा कोणीहि हमखास उपयोगी पडणारा गोलदाज सध्या आपणाजवळ नाही यावरून स्पष्ट होईल त्यामुळ आपला संघ आजपर्यंत मर्चंट हजारे अमरनाथ उमरीगार मुस्ताक व मोदी प्रभृतीच्या फल्दाजीवरच जयाची आशा बाळगीत आलेला आहे पण उत्कृष्ट गोलदाज कमी पड त्याने ती साध्य झालेली नाही

## आवश्यक गुण

गोल्दाजाला खालील गुण आवश्यक आहेत —

( १ ) शरीरप्रकृति निरोगी सशक्त व काटक

बरोबर गोलदाजी





खालील चित्रात मागचा पाय उचलला असला तरी रेषच्या आत आहे

★

सदोष गोलंदाजी ( ' नो बॉल ' )





असल्याशिवाय उन्हात तासानुतास मारा करण्याचे अवघड काम त्याला नीट पार पाडता येणार नाही

(२) शरीरयष्टि उंच, सडपातळ व चपळ असणं इष्ट आहे, तिच्याशिवाय अव्वल दर्जाचे कौशल्य साधणार नाही

(३) त्याला मनुष्यस्वभावाचं ज्ञान, प्रतिपक्षाच्या सामर्थ्याचा अंदाज व परिस्थितीचं आकलन झटकन होण्याइतका चाणाक्षपणा पाहिजे क्रीडांगणावर हवामान, हिरवळ आपले व प्रतिपक्षाचे डावपेच व खेळातले चढउतार सारखे बदलत असतात व या निरनिराळ्या उद्भवणाऱ्या प्रसंगांना अनुरूप व योग्य धोरण पद्धति व मार्ग त्याला योजावे लागतात त्याकरिता बुद्धि तरतरीत पाहिजे

(४) सतत श्रम व अभ्यास चालू ठेवण्याची तयारी


'ऑफब्रेक'साठी.


'लेगब्रेक'साठी

उमेदवारी त्याच्या हातून होणार नाही व अपेक्षित यश न मिळाल्या-बरोबर त्याचे प्रयत्न बंद पडतील शाळेत प्रथम चमकले, अल्पवयीन गोलदाज पुढे वरिष्ठ क्रिकेटमध्ये निस्तेज झाल्याची पुष्कळ उदाहरणे नज-रेस पडतात त्याचे कारण चिकाटीचा अभाव हेच असते इंग्लंडमध्येहि हौशी गोलदाजापेक्षा, धंदेवाइकाची मख्या टेस्ट क्रिकेटमध्ये अनेकपटीने जास्त का आहे, त्याचे कारण सहज समजेल गोलंदाजीत श्रेष्ठ पद मिळ-विण्याला जे कष्ट लागतात, ते मजेखातर केव्हातरी खेळ खेळण ऱ्याच्या हातून होत नाहीत

## गोलंदाजीचें तंत्र

वरील महत्त्वाच्या गुणाचा पाया जरी तयार झाला, तरी त्यावर उत्तम इमारत उभी करण्यास काही सर्वमान्य तंत्र अवश्य आत्मसात् करावे लागते त्यात मुख्य म्हणून खालील गाष्टी सागता येतील –

(१) चेंडूचा पहिला टप्पा (ज्याला 'लेंग्थ' म्हणतात) अचूक, ठराविक जागी, टाकता आला पाहिजे तितक्याच महत्त्वाचा दुसरा गुण म्हणजे चेंडूची दिशा (डायरेक्शन) यष्टीच्या रोखाने बरोबर असणे हे



' गुगली ' चेंडूसाठी



' स्वर्व ' चेंडूसाठी.

दोन गुण गोलंदाजीतल्या यशाचे आधारस्तंभ समजले जातात त्याच्या-शिवाय इतर अनेक गुण मातीमोल ठरतात चेंडू कितीहि वेगाने येवो, फिरत असो, किंवा फसवा म्हणून योजलेला असो, तो जर योग्य लांबीने ( गुड लेंग्थ ) न पडता, बॅटीवर पहिल्या टप्प्याने ( फुलपिच ) येईल तर नवशिका फलंदाजहि त्याची सीमापार रवानगी सहज करील तीच दुर्दशा, चेंडूचा टप्पा फार अलीकडे पडल्याने होईल म्हणून हे दोन्ही टप्प्यातले दोष वगळून, प्रत्येक गोलंदाजाने पहिला टप्पा उत्तम (गुड लेंग्थ) पडेल याबद्दल अत्यंत दक्ष राहिले पाहिजे योग्य टप ( गुड लेंग्थ ) हा गोलंदाजीचा प्राण आहे

## गुड लेंग्थ

या 'गुड लेंग्थ'चा आग्रह का ? कारण, ती गोलंदाजाला जितकी इष्ट व साधक, तितकीच फलंदाजाला अनिष्ट व घातक ठरते, असा प्रत्येक खेळाडूला सहज अनुभव येईल. त्याचे मुख्य कारण म्हणजे, फलंदाजापासून फार दूर नाही व जवळहि नाही, अशा ठराविक दोन फुटाच्या वर्तुळात



'ऑफब्रेक'साठी.



'लेगब्रेक'साठी.

उमेदवारी त्याच्या हातून होणार नाही व अपेक्षित यश न मिळाल्या-बरोबर त्याचे प्रयत्न बंद पडतील शाळेंत प्रथम चमकलेले, अल्पवयीन गोलंदाज पुढे वरिष्ठ क्रिकेटमध्ये निस्तेज झाल्याची पुष्कळ उदाहरणे नज-रेस पडतात. त्याचे कारण चिकाटीचा अभाव हेच असते इंग्लंडमध्येंहि हौशी गोलंदाजापेक्षा, धंदेवाइकांची संख्या टेस्ट क्रिकेटमध्ये अनेकपटीने जास्त का आहे, त्याचे कारण सहज समजेल गोलंदाजीत श्रेष्ठ पद मिळ-विण्याला जे कष्ट लागतात, ते मजेखातर केव्हातरी खेळ खेळणाऱ्याच्या हातून होत नाहीत

## गोलंदाजीचें तंत्र

वरील महत्त्वाच्या गुणाचा पाया जरी तयार झाला, तरी त्यावर उत्तम इमारत उभी करण्यास काही सर्वमान्य तत्त्व अवश्य आत्मसात् करावे लागते त्यात मुख्य म्हणून खालील गोष्टी सांगता येतील –

(१) चेंडूचा पहिला टप्पा (ज्याला 'लेंग्थ' म्हणतात) अचूक, ठराविक जागी, टाकता आला पाहिजे तितक्याच महत्त्वाचा दुसरा गुण म्हणजे चेंडूची दिशा (डायरेक्शन) यष्टीच्या रोखाने बरोबर असणे हे



'गुगली' चेंडूसाठी



'स्वर्व' चेंडूसाठी.

दोन गुण गोलंदाजीतल्या यशाचे आधारस्तंभ समजले जातात त्याच्याशिवाय इतर अनेक गुण मातीमोल ठरतात चेंडू कितीहि वेगाने येवो, फिरत असो, किंवा फसवा म्हणून योजलेला असो, तो जर योग्य लांबीने (गुड लेंग्थ) न पडता, बॅटीवर पहिल्या टप्प्याने (फुलपिच) येईल तर नवशिका फलंदाजहि त्याची सीमापार रवानगी सहज करील तीच दुर्दशा, चेंडूचा टप्पा फार अलीकडे पडल्याने होईल म्हणून हे दोन्ही टप्प्यातले दोष वगळून, प्रत्येक गोलंदाजाने पहिला टप्पा उत्तम (गुड लेंग्थ) पडेल याबद्दल अत्यंत दक्ष राहिले पाहिजे योग्य टप (गुड लेंग्थ) हा गोलंदाजीचा प्राण आहे

## गुड लेंग्थ

या 'गुड लेंग्थ'चा आग्रह का ? कारण, ती गोलंदाजाला जितकी इष्ट व साधक, तितकीच फलंदाजाला अनिष्ट व घातक ठरते, असा प्रत्येक खेळाडूला सहज अनुभव येईल त्याचे मुख्य कारण म्हणजे, फलंदाजापासून फार दूर नाही व जवळहि नाही, अशा ठराविक दोन फुटाच्या वर्तुळात

## दिशेचें महत्त्व

(१) चेंडूला कोणती दिशा (डायरेक्शन) द्यावी हे नवशिक्यालाहि सहज कळेल यष्टयाच्या नेमाने येणारा चेंडू चुकल्यास, धोका असल्यानें, तो केव्हांहि जपून खेळावा लागतो अर्थातच चेंडूची दिशा म्हणजे नेम अचूक पाहिजे तरच तो घातक ठरेल

(२) योग्य दिशा व टप्पा हा पाया मजबूत झाल्या वर गोलदाजाने चेंडूला वेगवेगळया गति, फिरती, उंची वगैरे देण्याचे प्रयोग करून त्यातील कसब हळूहळू शिकण्याचा प्रयत्न करावा, त्या शिवाय हल्लीच्या बिलिअर्ड टेबला प्रमाणें सुस्थितीत ठेवलेल्या हिरवळीवर फलदाजास थकवता येणार नाही गोल दाजाचें खरें उद्दिष्ट व कौशल्य प्रति स्पर्ध्यास आमिष दाखवून अगर भ्रम मात पाडून, त्याला जाळ्यात पकडण्यात असतें त्या दृष्टीने



वेडसरची गोलदाजी— १.
चेंडू हातात पकडून धावण्याच्या तयारीत

चेंडूंत वेगवेगळी उंची ( फ्लाइट ), वेग ( पेस ), फिरत ( स्पिन ) व फसवेगिरी ( गुगली ) कशी आणतां येईल, याचा अभ्यास करावा लागतो. ही सर्व शस्त्रास्त्रें भात्यात असल्याशिवाय गोलंदाज सच्या कसोटीला उतरणार नाही व उच्च क्रिकेटमध्ये त्याला यशहि येणार नाही. प्रतिस्पर्ध्याचे डावपेच व तयारीप्रमाणे निरनिराळी अस्त्रें योजावी लागतात.



वेडसरची गोलंदाजी– २.
हातांतून चेंडू सोडण्याच्या अवस्थेंत.

## उंची

चेंडू एकाच ठराविक उंचीवरून सारखे येत राहिल्यास यंत्राप्रमाणे ते सहज टोलवतां येतील. तसें होऊं नये व फलंदाजाला प्रत्येक चेंडू खेळताना पेच पडावा, गोंधळ उडावा, यासाठी निरनिराळ्या उंचीने परंतु बदलत्या टप्प्याने चेंडू टाकणें श्रेयस्कर आहे. म्हणूनच एकदम पहिला टप यष्टीवर पडून, आश्चर्यकारक रीतीने फलंदाज अत्यंत सोप्या चेंडूनेहि बाद झाल्याची उदाहरणें अनेक वेळां घडलीं आहेत. अवघड

प्रश्नाची तयारी केलेला विद्यार्थी परिक्षेत सोपे प्रश्न आले असता जसा नापास होतो, तशीच दुर्दशा फुलपिच' चेंडूने होते हा परिणाम अर्थातच चेंडूची उंची ( फ्लाइट ) एकदम बदलल्याने होत असतो

## फिरत ( स्पिन )

बोटांनी चेंडूला फिरत देऊन तो उजव्या किंवा डाव्या बाजूस टप्प्यानंतर वळवता येतो हे प्रत्येक खेळाडूला अनुभवाने माहीत असते चेंडू किती व कसा सहज स्पिन करता येईल याचे प्रात्यक्षिक बिलिअर्ड व टेनिसमध्ये जितके उत्तम देता येईल तितके क्रिकेटमध्ये चेंडू जड व मोठा असल्याने देता येत नाही चेंडूला चार दिशाप्रमाणे चार फिरती देता येतात डावी उजवी पुढची व मागची यानाच क्रिकेटमध्ये ' लेगब्रेक ', ' आफब्रेक , टॉप किंवा ओव्हर स्पिन , अंडर किंवा बॅक स्पिन ' अगर ' ड्रॅग अशा संज्ञा रूढ झाल्या आहेत त्यातल्या पहिल्या दोन त्यामानाने सोप्या पण दुसऱ्या दोन फार अवघड आहेत या सर्व फिरती विद्यार्थ्यांना बिलिअर्ड टेबलवर व टेनिस कोर्टावर चेंडूच्या प्रयोगाने उत्तम रीतीने दाखविता येतात व प्रथम टेनिसच्या मऊ चेंडूने गोलंदाजीस सुरवात केल्यास त्यात लवकर प्रगति करता येते रबराचा चेंडू बोटात नीट धरून सहज फिरवता येत असल्याने प्राथमिक शिक्षण सोपे होते

## ऑफब्रेक

साधारणपणे नव्वद टक्के गोलंदाज उजव्या हाताने चेंडू फेकीत असल्याने आफब्रेक ( फलंदाजाच्या उजवीकडून डावीकडे अगावर येणारे चेंडू ) सर्वसाधारण म्हणून सहजसाध्य व सरावाने गोलंदाजास व फलंदाजास सोपा वाटतो त्याचेएक कारण म्हणजे फलंदाजाला तो सहज दिसतो व टोलवता येतो हा गोलंदाजाच्या दृष्टीने तोटा असला तरी ऑफब्रेक वापरण्यात सध्याच्या 'एल्-बी डब्ल्यू' नियमाप्रमाणे गोलंदाजाचा जसा फायदा आहे तसा 'लेगब्रेक' मध्ये नाही कारण अलीकडे चालू असलेल्या नियमाप्रमाणे, चेंडू बाहेरून 'ऑफब्रेक'ने वळून यष्टीवर जाताना जर बॅटीशिवाय इतर साधनांनी अडवला गेला, तर फलंदाज 'एल्-बी डब्ल्यू' म्हणजे पायचीत होतो,

तसा तो लेगब्रेकने म्हणजे चेंडू डावीकडून उजवीकडे वळून पायावर आपटल्यास होत नाही या विशिष्ट फायद्यामुळे सध्या वरिष्ठ क्रिकेटमध्ये 'ऑफब्रेक' बराच रूढ झालेला आहे पण लेगब्रेक चेंडूला हा फायदा नसला तरी लेगब्रेक फलंदाजाला अवघड असल्याने घातक ठरतो. तो पाठीमागून डाव्या बाजूने अंगावर येत असल्याने, टेनिसच्या 'बॅकहँड' टोल्याप्रमाणे फलंदाजाला फार त्रासदायक वाटतो व खूप अभ्यासाशिवाय त्याला तोड देता येत नाही.

## लेगब्रेकचें महत्त्व

उजव्याला जसा 'ऑफ' तसा डावखोऱ्या गोलंदाजाला 'लेगब्रेक' सहज शिवता येतो लेगब्रेकचे शस्त्र जवळ असावे म्हणून एखादा तरी डावखोरा गोलंदाज संघात अवश्य घेतात चेंडू टाकताना बोटांनी डावीकडून उजवीकडे तो फिरवल्यास 'ऑफ' व उलटे केल्यास 'लेगब्रेक'ची फिरत साधते, तसेच चेंडू खालून वर फिरवता आल्यास 'टॉप स्पिन' व उलट वरून खाली करता आल्यास 'अंडर स्पिन' किंवा 'ड्रॅग' साध्य होतो या दोन्ही फिरती बिलिअर्ड टेबलावर त्या खेळाच्या काठीने स्पष्टपणे दाखविता येतील पहिलीने चेंडू पुढे ढकलला जाऊन त्याचा वेग टप्प्यानंतर एकदम वाढतो, तर 'ड्रॅग'ने तो कमी होतो बिलिअर्डमध्ये ह्या 'ड्रॅग' अगर 'स्क्रू' ( Screw ) फिरतीने चेंडू प्रथम फूटभर पुढे जातो व झटकन मागे ओढला

## स्विंग गोलंदाजी

नवा चेंडू, दमट व सर्द हवा आणि दाट व टणक हिरवळ, याचा नैसर्गिक फायदा जरी सर्वांनाच 'स्विंग' गोलदाजी करण्यास मिळत असतो, तरी अभ्यासाने व शिक्षणाने, स्विंगमध्ये कमीजास्त बदल व डावी-उजवी दिशा हवी तशी देता येते हा गतिबदल (स्विंग) करण्यास चेंडू कसा धरावा व फेकताना हाताची व शरिराची हालचाल कशी करावी, हे तज्ञ शिक्षकाच्या मदतीने जास्त लवकर समजते. साधारणपणे डावखोरे 'इन स्विंग' म्हणजे चेंडू बाहेरून (ऑफकडून) आत यष्टीकडे सहज आणू शकतात. उलट दिशेने, उजवे फिरवू शकतात पण यातहि उलटापालट व बदल करता आला तर, तो गोलदाज फारच प्रभावी ठरेल उदाहरणार्थ, ऑस्ट्रेलियन 'लिंडवॉल'चा वेग जास्त असला तरी, इग्रज 'बेडसर' दोन्ही स्विंग करू शकत असल्याने, नव्या चेंडूने जास्त प्रभावी ठरलेला दिसेल स्विंग करताना, चेंडूची शिवण तर्जनी व मधल्या बोटामध्ये उभी धरून, चेंडू सोडण्याच्या शेवटच्या क्षणाला अंगठयाने झटका देऊन, मनगट डावीकडे वळवल्यास 'आउट स्विंग' म्हणजे फलदाजाच्या पायाकडून स्टपावर जाईल उलट, तर्जनीने झटका देऊन, मनगट उजवीकडे वळल्यास, 'इन स्विंग' म्हणजे बाहेरून चेंडू पायाच्या दिशेने यष्टीकडे आत येईल. नव्या चेंडूची गति अशी आत किंवा बाहेर वदलता आल्याने, 'इन स्विंग'चा झेल पकडण्यास लेगस्लिपकडे दोनतीन रक्षक ठेवणे श्रेयस्कर असते. उलट, 'आउट स्विंग' बाहेर जात असल्याने तीन स्लिप-रक्षक तयार ठेवावे लागतात 'इन स्विंग' बाहेरून यष्टीवर येताना, पायाने थोपविल्यास, फलदाज पायचीत होतो. तसा 'आउट स्विंग'ने होण्याचा कायदा हल्ली तरी नियमात नसल्याने 'इन् स्विंग गोलदाज' जास्त प्रभावी ठरतो- गेल्या युद्धापूर्वी दोनशे धावा झाल्या-नतरच गोलदाजाला नवा चेंडू घेण्याचा हक्क होता. पण १९४६ पासून टेस्ट सामन्यात प्रयोग म्हणून चेंडूची पासष्ट षट्के पुरी झाल्यानतरसुद्धा वाटल्यास नवा चेंडू घेण्याची मुभा ठेवली आहे त्यामुळे अलीकडे नवे चेंडू जास्त प्रमाणात वापरण्याची संधि मिळून स्विंग करणाऱ्याची उपयुक्तता व आवश्यकता जास्त वाढली आहे.

## शरीरवेधी 'आपटबार'

तुफानी व तीव्र गोलंदाजावर काही प्रसंगी धावरट फलंदाजावर हल्ला करून बाद करण्याची कामगिरी सोपवली जाते. क्रिकेटचा खेळ जरी हॉकी, फूटबॉल व हुतुतूच्या मानाने सौम्य असला, तरी चुरशीच्या लढतीत त्याला रौद्र स्वरूप धारण करावे लागते व अशा वेळी अंगावर येणारे 'आपटबार' (बपर्स) कपाळमोक्ष केव्हा करतील याचा नेम नसतो "युद्धात काहीहि क्षम्य ठरते," याचे बपर्स हे उत्तम उदाहरण आहे १९३२ च्या अँग्लो-ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये अजिंक्य ठरलेल्या ब्रॅडमनला नामोहरम करण्यास इंग्लडने 'लारवूड' प्रभृति गोलंदाजांच्या 'बपर्स'चा उपयोग केला व त्या वर्षी प्रबळ ऑस्ट्रेलियास लोळवले पण या मारा-मारीच्या क्रिकेटने दोन्ही देशात पुढे वितुष्ट माजेल व क्रिकेटमध्ये कलेपेक्षा पाशवी सामर्थ्याचा जास्त उपयोग केला जाईल व खेळीमेळीच्या आनंदाचे वातावरण नष्ट होईल या भीतीने, क्रिकेटचे नियमन करणाऱ्या एम्. सी. सी. ने 'बॉडीलाइन' शरीरवेधी बपर्स मुद्दाम व सतत फेकण्यास मनाई केली अर्थात् पंचाची व नियमाची हरकत न येईल, अशा रीतीने अजूनहि मधूनमधून आपटबार सोडता येतात १९४८ मध्ये ऑस्ट्रेलियनानी पाचापैकी चार टेस्ट इंग्लंडविरुद्ध जे जिंकले, त्याला लिंडवॉल व मिलर यांचा तुफानी

(४) जर गोलदाज पचाला पूर्वसूचना न देता, चेंडू नेहमीप्रमाणे ओव्हर आर्म (खांद्यावरून) न टाकता अंडर आर्म (खांद्याखालून) टाकील, उजव्या हाताऐवजी डावा हात वापरील किंवा यष्टयाच्या डावीऐवजी (ओव्हर वुइकेट) उजवीकडून (राउंड वुइकेट) चेंडू एकदम टाकील तर तो चेंडू आक्षेपार्ह समजून 'नो बॉल'प्रमाणे मोजला जाणार नाही व त्यामुळे फलंदाज बाद होणार नाही

(५) चेंडू बॅट न पोचेल इतक्या दूर (वाइड) टाकल्यासहि तो नियमबाह्य ठरतो नो बॉल व वाइड बॉलबद्दल शिक्षा म्हणून एक धाव प्रतिपक्षाला आपोआप बहाल करण्यात येते. मात्र असा चेंडू मारला गेल्यास व फलदाजाने काही धावा काढल्यास मग वेगळी जास्त धाव (दंडाबद्दल) दिली जात नाही

## मध्यम वेगाची गोलंदाजी

मध्यम वेगाचे गोलदाज योग्य टप्पा व फिरत ('लेंग्थ' व 'स्पिन्') यावर सर्वस्वी अवलंबून असतात प्रतिपक्षाला बाद करण्याबरोबर, त्याच्या धावा कमी कशा होतील यावर त्याना लक्ष ठेवावे लागते आघाडीच्या तुफानी माऱ्याच्या तोफखान्याने आपले थोडेफार काम केल्यावर, या मागच्या रांगेतील गोलदाजाची पाळी येते जुना वापरलेला चेंडू त्याच्याकडे सोपविला जात असल्याने त्याना शक्तीपेक्षा युक्तीचा वापर जास्त करावा लागतो व वेगवेगळ्या फिरतीचे, वेगाचे व उंचीचे चेंडू सोडून, फलदाजाला जाळ्यात पकडावे लागते अशा वेळी लेग व ऑफकडून फिरती आलटून-पालटून उपयोगी पडतात. नेहमीचा यशस्वी प्रकार म्हणजे तीनचार 'लेगब्रेक' योजून नंतर लगेच एक 'ऑफब्रेक' जास्त वेगाने सोडल्यास फलदाज फसून पायचीतचा बळी त्यानीने मिळतो जुन्या क्रिकेटमध्ये पी. वाळू व अलीकडे चंदू सरवटे व विनू मानकड या प्रकारच्या गोलंदाजीत विशेष यशस्वी झालेले आहेत

## मंद वेगाची गोलंदाजी

मंद गोलदाजाचे मुख्य ध्येय व मार्ग म्हणजे फलदाजास आमिष दाखवून व फसवून रेषेपुढे येऊन टोले मारण्यास प्रवृत्त करणे एरवी

सावध असलेला फलंदाज अशा वेळी चेंडू सहज मारता येईल म्हणून फसतो व झेलबाद अगर यष्टिबाद (स्टम्ड) होतो तो ज्या मानानें चपळ असेल, त्या मानाने गोलदाजाने चेंडूचा वेग, उची, टप्पा बदलत ठेवला पाहिजे व क्षेत्ररक्षकाचा व्यूह आपल्या बेताप्रमाणे रचला पाहिजे ही गोलदाजी सिद्धीस जाण्यास क्षेत्ररक्षक सर्वोत्कृष्ट पाहिजेत कारण त्याना अनेक जोरकस टोले न भिता अडवावे व झेलावे लागतात मद गोलदाजानें मार खाल्ला तरी घाबरून जाऊ नये उलट प्रतिपक्षी जाळ्यात नक्की सापडणार असे समजावे काही आमिष दिल्याशिवाय मासा गळाला कधीच लागत नाही. फलदाजाला समोर उचावरून टोले मारावे लागतील अशा बेताने, शक्य तितक्या पुढे, कधीकधी अर्धा किंवा पूर्ण (हाफ किंवा फुल) व्हाली टाकण्यास बिचकू नये कारण फार सोपा वाटणारा चेंडू, बेसावधपणे टोलावला जातो व तोच नाशाला कारण होतो

वरील तीन प्रकारच्या गोलदाजाचे जरी वेगळे मार्ग व इलाज असले तरी सर्वांनी पाळल्याच पाहिजेत अशा काही सूचना करता येतील

( १ ) प्रत्येकाने सेनापतीचे म्हणजे नेत्याचे डावपेच समजून घेऊन तेच अमलात आणले पाहिजेत क्षेत्रिकाची योजना करताना आपण सूचना कराव्यात, पण त्या नेत्यावर लादू नयेत त्या अमलात न आल्यास नाउमेद न होता प्रयत्न चालू ठेवावेत

( २ ) नेत्याने जसा व्यूह रचून दिला असेल, त्याला अनुरूप गोलदाजी करण्याची शिकस्त केली पाहिजे क्षेत्ररक्षक 'आफ'कडे असताना, 'लेग'कडे चेडू टाकणे असभ्य आहे हा दोष टाळण्याम अचूक, नेमाने गोलदाजी साध्य झाली पाहिजे

( ३ ) झेल सुटले, पचानी विरुद्ध निकाल दिले, किंवा फलदाजानी टोलेबाजी करून त्रेधा उडवली, तरी गोलदाजाने न घाबरता अगर रागावता, शातपणे आपले काम करीत राहावे चिडखोर खेळाडूला यश तर नाहीच, पण खेळाचा आनदहि लाभणार नाही

( ४ ) वेळी-अवेळी न्याय मागण्यास (अपील) प्रवृत्त होणे ही अनिष्ट व खेळाडूपणास न शोभणारी सवय आहे तीमुळे खेळाचा विरस तर

होतोच, शिवाय पंचाचे मन कलुषित होऊन, आपल्याविरुद्ध नाहक निकाल दिला जातो

( ५ ) गोलदाजीत यश कष्टसाध्य असल्याने, प्रत्येकाने नियमित व्यायाम व आहार-विहार ठेवून, उत्कृष्ट तन्दुरुस्ती राखली पाहिजे

( ६ ) प्रत्येकाने दुसऱ्याच्या पद्धतीचे अनुकरण करण्याचा त्रास न घेता आपल्याला जमेल व सोयिस्कर वाटेल त्याप्रमाणे गोलदाजीचा प्रकार व पद्धति स्वीकारावी प्रत्येकाच्या शरिराची ठेवण भिन्न असल्याने, त्याची तऱ्हा सर्व बाबतीत वेगळी असणारच तरीपण सर्वसाधारणपणे असे सांगता येईल, की धावणे, हात फिरवण चेंडू वाटात धरणे व झटका देऊन शेवटी सोडणे या सर्व क्रिया जितक्या सहज व सफाईने होतील तितक्या श्रेयस्कर त्यामुळे गोलदाजी आकर्षक दमदार व परिणामकारक ठरेल उजव्या गोलदाजाने आपला डावा खांदा फलदाजाकडे शेवटी चेंडू फेकताना वळवल्यास कमी श्रमात, चेंडूचा वेग वाढेल हे अनुभवाने सहज कळेल डावखोऱ्याला उलट करावे लागेल फलदाज जर तिरपा डावा खांदा पुढे करून उभा न राहता समोरच्या यष्टीकडे तोंड करून उभा राहील तर त्याला जसा टोला जोरात मारता येणार नाही, तीच अवस्था गोलदाजाची होईल टेनिस व बॅडमिंटनमध्ये जाळयाला समान्तर उभे न राहता, टोला मारताना तिरपे होण्याने हाताला जास्त वेग आणण्याला वाव मिळतो यालाच 'बॉडी स्विंग' म्हणतात त्याचप्रमाणे चेंडू सुटल्यावर हात एकाएकी न आखडता, तो शक्य तितका सैल मोडून पुढे जाऊ द्यावा या सैलपणाला 'फॉलो थ्रू' असे पारिभाषिक नाव असून, त्यामुळे मेहनत कमी पडून वेग जास्त वाढण्याचा फायदा होतो शक्य तो हात उंच करून चेंडू सोडण्याची पद्धत शिकल्यास ती दिसण्यात सुंदर तर होईलच, शिवाय चेंडू जास्त उंचीवरून पडल्याने तो टप्प्यानंतर जास्त उडेल व खेळण्यास अवघड वाटून त्याने झेल उडण्याचा संभव वाढेल

संशोधक जसा शास्त्राच्या आवडीने सारखे प्रयोग करीत राहून निरनिराळे शोध लावून ज्ञानात भर टाकतो, तीच प्रवृत्ति आणि भावना

गोलंदाजात असल्याशिवाय फलंदाजांना सर्वस्वी अनुकूल असणाऱ्या हल्लीच्या सपाट व सुरेख हिरवळीवर हमखास यश मिळणे कठीण आहे

## फिरत (स्पिन) कशी द्यावी?

कोणत्याहि दिशेने चेंडूला फिरत देताना, बोटांना मुख्य कामगिरी करावी लागते वाद्य वाजविणाऱ्या कलावानाची बोटें जशी बारीक, लांब, लवचिक व चपळ असावी लागतात, तशीच यशस्वी गोलंदाजाच्या बाबतीत आढळून येतील तशी असल्यासच त्याला चेंडू घट्ट पकडून, हवी तितकी व हवी त्या दिशेने फिरत देता येईल साधारणपणे आखड बोटांपेक्षा लांब बोटांच्या गोलंदाजाला परिस्थिति अनुकूल असते

## ऑफब्रेक

उजव्या हाताला 'ऑफब्रेक' सहज साध्य असतो कारण चेंडू त्या फिरतीत डावीकडून उजवीकडे वळवावयाचा असल्याने बोटें, मनगट, खांदा व सर्व शरीराच्या हालचाली सुलट म्हणजे नैसर्गिक वाटतात याच्या अगदी उलट प्रकार 'लेगब्रेक' वापरताना होतो व म्हणून ती उलट फिरत त्रासदायक वाटते व मेहनतीशिवाय साधत नाही डावखोऱ्याला अर्थातच उलटें वाटेल ऑफब्रेकसाठी चेंडू मधले बोट, तर्जनी (इन्डेक्स फिंगर) व अंगठा यात धरला जातो व जरी ही तिन्ही बोटें चेंडू फिरवण्यास उप-

उलट म्हणजे उजवा खादा फलदाजाच्या रोखाने शेवटच्या क्षणी वळवून चेडू फेकावा ज्याची बोटें आखूड असतील व म्हणून चेडू नीट घट्ट पकडण शक्य नसेल, त्यानी तळहाताची मदत घ्यावी मनगट लवचिक असल्यास, चेडूला झटका देता येतो व फिरतीची क्रिया वाढविता येते टेनिसमध्ये ज्याप्रमाणे टोला मारताना खेळाडूने जाळ्याकडे डावा किंवा उजवा खादा फिरवला पाहिजे तरच हात नीट वळून चेडूत भरपूर वेग येतो त्याच-प्रमाणे गोलदाजान हालचाली केल्या पाहिजेत

## लेगब्रेक

लेगब्रेकसाठी चेडू उलट म्हणजे उजवीकडून डावीकडे फिरवावयाचा असतो म्हणजे तो टप्प्यानतर त्या दिशेनें वळल टेनिसमध्ये बॅकहॅंड' टोला जसा अवघड, तसाच क्रिकेटमध्य लेगकडून स्टपावर येणारा चेडू व तो टाकण्याची कला अवघड असते कारण त्यासाठी हाताच्या बोटाच्या व शरिराच्या हालचाली सव अवयव पिरगळल्याप्रमाणे म्हणजे अनैसर्गिक-पणे कराव्या लागतात व म्हणूनच लेगब्रेकमध्य कुशल वीर फारच थोडे असतात डावखोऱ्याना मात्र त्यात लवकर प्रगति करता येते व म्हणून ते जास्त चमकतात त्याना अर्थातच आफब्रेक साधत नाही लेगब्रेकची प्राथमिक तयारी करण्यास हाताचा तळवा समोर वर करून त्यात चेडू अगठा व त्याजवळच्या तीन बोटानी पकडा नतर तळवा व मनगट झट-कन उजवीकडून डावीकडे वळवा व त्याच वेळी तीन्ही बोटानी त्याच दिशेन चेडूला फिरत द्या म्हणजे लगब्रेकची प्रक्रिया तुम्हाला समजल पुढे प्रत्यक्ष प्रयोगानें व सरावाने चेडूला अचूक नम व पुष्कळ वेग फिरती-बरोबर देता येईल

वापरतांना सर्व हालचाली लेगब्रेकप्रमाणे तंतोतंत झाल्या पाहिजेत. मात्र चेंडू सुटण्याच्या शेवटच्या क्षणी तळवा फलंदाजाकडे नेहमीच्या 'लेगब्रेक' पद्धतीने न वळवतां, तो उलट दिशेला म्हणजे गोलंदाजाच्या दिशेला वळवावा लागतो असे करताना चेंडू नेहमीप्रमाणे तळव्यातून न निघता, तो करंगळीवरून तळव्याच्या पाठीच्या बाजूने सुटतो मनगटाचा लवचिकपणा अर्थातच या अवघड कलेला फार आवश्यक आहे

## टॉप किंवा फॉरवर्ड स्पिन व बॅक स्पिन

टॉप स्पिनमुळे चेंडू जमिनीवर पडल्यावर त्याला जास्त गति मिळते. तो टाकण्यास चेंडू मागून पुढे फिरेल असा टाकला पाहिजे त्याकरिता चेंडू हातातून सोडताना, तळवा जमिनीकडे व त्याची पाठ वर ठेवावी व अगदी शेवटच्या क्षणी ती वळवून खाली आणावी चेंडूला लेगब्रेकसारखीच परंतु पुढून मागे फिरत दिल्यास, तो पडल्यावर त्याचा वेग कमी होईल

## स्विंग : इन् व आउट

स्विंग व स्पिन यातला फरक मोठ्या सामन्यात बऱ्याच वेळा प्रत्यक्ष खेळल्याशिवाय समजणार नाही साधारणपणे स्विंगसाठी नवा चेंडू जास्त सोयीचा, तर स्पिनसाठी जुनाच पाहिजे स्पिन बोटाच्या मदतीने व घर्षणाने, चेंडूला फिरवून केला जातो व असा चेंडूची तो जमिनीवर पडल्यावर दिशा लहान कोन करून एकदम पालटते त्याकरिता गरवरीत चेंडू व

च्या म्हणजे आउट-स्विंग होऊन चेंडू ऑफकडे जाईल इन्-स्विंगसाठी चेंडूची शिवण थोडी लेग बाजूस वळलेली ठेवा व तो प्रत्यक्ष सोडताना मनगटाचा झटका उलट म्हणजे डावीकडून उजवीकडे मारा. म्हणजे इन्-स्विंग होऊन चेंडू लेग बाजूस जाईल हे दोन्ही स्विंग साधण्यास व त्याचा नीट समाचार घेण्यास, गोलंदाज व फलंदाज या दोघांनी नवा गुळगुळीत चेंडू व दाट हिरवळीचे सपाट मैदान वापरले पाहिजे, व साधी किंवा स्पिन गोलंदाजी व स्विंग यातला फरक अदाजला पाहिजे कातड्याचे चेंडू लवकर खराब होत असल्याने, विद्यार्थ्यांना प्लास्टिकचे अलीकडे उपलब्ध असलेले चेंडू द्यावेत ते पुष्कळ वेळ टिकतात, टकमकीत राहतात व स्विंग शिकण्यास उपयुक्त ठरतात असा अनुभव आहे

स्वर्व व स्विंग हे शब्दप्रयोग जरी वेगाने तिरपे घुसणाऱ्या चेंडूला एकाच अर्थाने बऱ्याच वेळा वापरतात, तरी त्यात फरक करणे इष्ट आहे जेंव्हा चेंडू खाली जमिनीवर पडण्यापूर्वीच हवेत कप पावून गति बदलतो तेव्हा त्याला 'स्वर्व' म्हणावे चेंडू अगदी कोरा करकरीत व हवा अत्यंत दमट व सर्द असेल, त्या वेळी वेगवान गोलंदाज हाताच्या झटक्याने 'स्वर्व' उत्पन्न करू शकतो अशाच परिस्थितीत नवा चेंडू टप्पा पडून जेंव्हा मूळ गति बदलतो व डावी अगर उजवीकडे वळतो तेव्हा त्याला 'स्विंग' म्हणतात, व हाच प्रकार जास्त रूढ आहे इंग्लंडची सर्द हवा, दाट हिरवळ, व उत्कृष्ट मैदान या तीन अत्यंत अनुकूल गोष्टींमुळे, तेथे स्विंग गोलंदाजी सहज व बराच वेळ योजता येते याच्या अगदी उलट परिस्थिति भारतात, विशेषत महाराष्ट्रात दिसून येते अर्थातच येथे चेंडूचा नवेपणा चार षटकांपेक्षा जास्त वेळ टिकत नाही, व म्हणून 'स्विंग'चे भय फलंदाजाला कधीच घाम देत नाही स्विंगमध्ये उत्कृष्ट कौशल्य व यश, नुकताच दिवंगत झालेला इंग्लंडचा डावखोरा फोलंदाज 'जॉर्ज हर्स्ट' याने पचेचाळीस वर्षांपूर्वी प्रथम मिळविले व म्हणून 'स्विंग' गोलंदाजीचा जनक म्हणून त्याला मान देता येईल १९२१ साली मुंबईत प्रतिवर्षी होणाऱ्या चौरंगी सामन्यात 'हर्स्ट व ऱ्होड्स्' हे दोघे यॉर्कशायरचे वीर खेळत होते व त्या वेळी ऱ्होड्स्ची फलंदाजी व हर्स्टची अप्रतिम स्विंग गोलंदाजी आम्हास त्याविरुद्ध खेळताना जवळून पाहता आली होती

★ ★ ★

चिकाटी लागते, पण फलदाजीत काही नैसर्गिक गुण– तीक्ष्ण नजर, लवचिक मनगट व चपळ पाय असल्यास वरचा दर्जा विशेष श्रमाशिवाय मिळवता येतो तीत कष्टाचा भाग कमी असतो ह सत्य फलदाज गोलदाजाच्या मानाने पुष्कळ जास्त काळ संघात आपले स्थान टिकवू शकतो यावरून लक्षात येईल गोलदाज– विशेषत वेगवान– तिशीच्या पुढे निकामी ठरतो

## आरोग्य व आत्मविश्वासाचें महत्त्व

अस असर मरी दोन गोष्टी फलदाजाची प्रगति अवघड करतात पहिली म्हणजे सामन्यात त्याला एकहि चूक क्षम्य असत नाही चुकून जरी त्याने चडूला हात लावला किंवा सरळ यष्टीवर जात असता तो पायाने अडवला अगर दुलक्षाने अगदी साधी चूक केली, तरी खेळातून बाद होण्याची घोर शिक्षा त्याला होते व पुन्हा संधि त्या डावात तरी मिळत नाही याचा अर्थ, बचावाची प्रथम काळजी घेऊन त्याला चढाई करावी लागते फलदाजाच जीवित मैदानावर अस अस्थिर व क्षणभगुर असल्यानेच, क्रिकेटचा खेळ बेभरवशी आहे असा त्यावर आरोप आहे विख्यात नामांकित फलदाज कधी कधी शून्य धावावर परत येतात व अस दुर्दैवाने लागोपाठ घडत गेल्यास, खेळात त्याचा उत्साह राहत नाही दुसराहि एक दोष प्रगतीच्या आड येतो, तो घावरटपणाचा प्रत्येक फलदाज पहिल्या सामन्यास तोड देताना थोडा

सुस्थितीवर आधारित गुण आहे. शिस्त, स्थिरता व संयम हे मनाचे धर्म वाटत असले तरी त्यांचे अधिष्ठान शारीरिक आरोग्य आहे हें सहज पटेल. यशापयशाकडे पूर्ण दुर्लक्ष करण्याइतकी शांत तटस्थ वृत्ति, क्रीडांगणावरील आयुष्यातहि अशी बाणणे खेळाडूला उत्तम कामगिरी व यश लाभण्यास अवश्य आहे

या मनोभूमिकेच्या पायावर पुढील इमारत उभारण्यास फलंदाजीला अवश्य म्हणून पुढील सूचना करण्याजोग्या आहेत –

(१) सरळ उभी बॅट– गोलंदाजीचा जसा अचूक टप्पा (गुड लेग्थ) हा पाया आहे, तसा बॅटीचा सरळपणा हा फलंदाजीचा समजला पाहिजे. यष्टीवर येणारा प्रत्येक चेंडू, केव्हाहि व कोणीहि उभ्या, सरळ बॅटी-नेच खेळला पाहिजे तरच उच उभ्या यष्टयांचे भरपूर संरक्षण होईल आडव्या बॅटीने तितके कधीच होणार नाही हे स्पष्ट आहे पण नव-शिक्याची नैसर्गिक प्रवृत्ति मागे सरून आडव्या बॅटीने चेंडू उंच मारण्याची असते. ती दूर करणे हे शिष्याचे व शिक्षकाचे पहिले कर्तव्य असते

(२) एकाग्रता– चेंडूवर दृष्टि नेहमी एकाग्र ठेवली पाहिजे तरच येतांना व फिरत येणारा चेंडू नीट दिसेल व खेळता येईल ही साधी वाटणारी गोष्ट किती व का अवघड आहे हे गोलंदाजीवरील प्रकरण ९ मधील विवेचनावरून दिसून येईल शिवाय गोलंदाज फिरती (स्पिन) व फसवी (गुगली) गोलंदाजी करीत असेल तर, चेंडू कोणत्या बाजूने कसा वळणार, हे आगाऊ समजण्यास त्याच्या बोटाकडे लक्ष ठेवणे तितकेच अवश्य आहे

(३) स्थिरता– चेंडू गोलंदाजाच्या हातातून सुटल्यानंतरच, तो कसा व कोणत्या पद्धतीने खेळावयाचा, ते ठरवावे घाईने आगाऊ ठर-विल्यास व तशी हालचाल केल्यास, गोलंदाज सावध होऊन आपले डाव-पेच व चेंडूफेक बदलील आणि तें घातक ठरेल. प्रत्येक चेंडूफेक वेगळी असून, तिचा वेगळ्या स्वतंत्र पद्धतीने समाचार घेतला पाहिजे, तरच धोका टळेल व टोला नीट बसेल

(४) परिस्थितीचा अंदाज– प्रतिपक्षाचे डावपेच, मैदानाचे गुण-धर्म व गोलंदाजाचे कसब नीट अजमावल्याशिवाय सुरवातीला एकदम चढाईचे धोरण पत्करू नये. शिवाय मैदानावरच्या तीव्र व नव्या प्रकाशाशीं व परिस्थितीशी पूर्ण परिचित झाल्याशिवाय टोलेबाजीचा एकदम अवलंब केल्यास चूक होण्याची भीति असते. हातापायाचे स्नायू डोळ्याप्रमाणेच बदलत्या परिस्थितीशी समरस व कार्यक्षम होण्यास वेळ लागतो व तेवढा

होऊन, मारलेला चेंडू उंच चढून, झेलला जातो कित्येक फलदाज अभ्यासाने तयार झाले, तरी, चेंडू वेगाने उडून अंगावर आला असता त्रिचकून मागे सरतात साहजिकच, चेंडू अडवताना बॅट तिरपी होते व झेल उडतो हा दोष वाटेल ते करून घालविला पाहिजे अशा वेळी उजवा पाय आपण मेखेला बांधला व त्यामुळे मागे पाय घेणे अशक्य झाल्याने, सुरवातीचा पळपुटेपणा आपण घालविला, असे इग्लंडमध्ये भारताचे नाव पन्नास वर्षापूर्वी गाजविणारे जगविख्यात रणजितसिंह आपल्या आठवणीत लिहितात भीतीने मागे पाऊल घेण्याने दुसरी हानि म्हणजे, या हालचालीत चेंडूवरचे आपले लक्ष उडत व तो अंगावर येण्याचे व इजा होण्याचे जास्त भय असते. तुफानी चेंडूविरुद्ध स्वसरक्षण करण्यास आपल्या हातात बॅटीचे उत्तम शस्त्र असते व त्यामुळे केवळ बचावच नव्हे, तर चढाईसुद्धा करता येते मात्र ते वापरणारा, आपल्या जागी स्थिर व खंबीर पाहिजे



फलदाजीसाठी सज्ज (लीअरी कॉन्स्टटाइन)

सहज वाढते आणि म्हणूनच 'लाब हॅंडल' वापरणे म्हणजे टोलेबाजी करणे, असा वाक्प्रचार क्रिकेटमध्ये रूढ आहे हातापेक्षा गोफणीने दगड जास्त दूर सहज फेकता येतो कारण तीमुळे हाताची लावी आपोआप



चढाईंत बचावाचा उत्तम मार्ग

वाढते मूठ खाली धरणारे फार तर बचावाचा खेळ साधतील, पण आक्रमक व धडाडीच्या टोल्यात ते खास मागे पडतील दणकेबाज टोलेबाजीसाठी प्रसिद्ध सी के नायडू याचा पवित्रा व बॅटीची पकड नमुनदार आहे चांगला नफाईदार टोला बसण्याला बॅट हातात चट्-कन फिरली पाहिजे व हे साधण्यास, ती सहज पेलता येईल इतकी हलकी असावी जितकी ती जड तितका टोला लांब जाईल हा भ्रम आहे बॅटीची पकड शक्य तितकी दांड्याच्या वर घेतल्याने, ताठ उभे राहण्यास मदत होते व त्यामुळे खेळात धडाडी येऊन उत्साह वाढतो



लेग हुक (डब्ल्यू ज एड्रिच याचा एक टोला)

(३) बॅटीची उभारी व हालचाल— चेंडू गोलंदाजाच्या हातातून सुटल्या बरोबर, बॅट उचलून व थोडी मागेपुढे हालवून तिला गति दिली असता टोला कोणता व कोणीकडे मारा वयाचा त्याची योजना चट-कन करता येते तुफानी माऱ्याला तोंड देताना अशी बॅटीची आगाऊ हालचाल फारच उपयोगी पडते बॅट जागच्या जागी स्थिर असल्यास निमिषार्धात येणारा चेंडू ती उचलली जाण्याच्या पूर्वीच मागे निघून जाण्याचे

होण्याचा सभव कमी होतो कारण, तेवढ्या दोन तीन फूट अतरात चेडू वळून बाहेर जाण्याचा सभव वाढला असता, असा पचाचा ग्रह होतो निदान सशयाला तरी जागा राहून त्याचा फायदा नेहमीच्या प्रथेप्रमाणे फलदाजाला मिळू शकतो



लेगकडे टोला– 'पुल'. (कॉन्स्टटाइन)

ऑफस्पिन चेंडू हाफव्हाली (यष्टीजवळ टप्पा) असल्यास, टोला सोपा वाटतो, पण चेंडू जास्त वेगाने वळून बॅटीवर आल्याने, झेल जाण्याचा फार मोठा धोका असतो 'स्पिन' मोठा व जलद होत असल्यास, व 'लेगस्लिप क्षेत्ररक्षक, जवळ झेल घेण्यास उभा असल्यास, पुढे खेळण्यात नि संशय धोका आहे मागे खेळण्याने चेंडूची फिरत नीट दिसेल व चेंडू मारणे किंवा सोडणे सहज ठरवता येईल म्हणून गुडलेंथ स्पिन मागे खेळा लेगकडून चेंडू वळून येत असल्यास, नियमाप्रमाणे पायचीत होण्याचे भय कमी असले तरी, बाहेरचा चेंडू आडव्या बॅटीने टोलावण्याचे आमिष कटाक्षाने टाळले पाहिजे फिरतीच्या विरुद्ध दिशेने टोला सोपा वाटला तरी कधीहि मारावयाचा नाही, अशी खूणगाठ होतकरू फलंदाजाने मोठ्या सामन्यात मनाशी बांधली पाहिजे या बाबतीत थोड्याहि गाफीलपणाने अनुभवी फलदाज ऐन वेळी गेलबाद झाल्याची अनेक उदाहरणे घडलेली आहेत ऑफब्रेक लेगकडे टोलावणे जितके सोपें, तितकेच लेगब्रेकच्या बाबतीत अवघड व धातक असतें, हे लक्षात ठेवावे



लेग पुल. (इंग्लंड वि भारत या लीड्स् येथील कसोटी सामन्यात श्री माजरेकर)

## मंदगति व गुगली गोलंदाजी

मद चेडू टाकण्यात मुख्य हेतु फलदाजाला प्रलोभन दाखवून रेषेपुढे ओढून, टोलेबाजीस प्रवृत्त करणे हा असतो फलदाजाने हे आव्हान स्वीकारले पाहिजे कारण आपल्या जागेस चिकटून राहण्यात शत्रूला जोर चढून आपला धोका वाढतो, उलट चढाईने बचाव आपोआप लाभून दोन्ही फायदे पदरात पडण्याचा समव असतो चपळ फलदाजाने शक्य तेव्हा पुढे चाल करून, मद व गुगली चेडू, पहिल्या टप्प्यावर गाठून टोलवाव म्हणजे त्यातल्या फिरतीचे भय उरणार नाही गोलदाजाच्या बोटाच्या व मनगटाच्या हालचालीकडे प्रथम काही वेळ सूक्ष्म नजर ठेवल्यास गुगली कोणता



लेग पुल (फलदाज–वॉलकॉट)

व कसा वळेल तें कळेल व तो सहज खेळता किंवा टोलावताहि येईल जादूचे इंगित एकदा कळले की जसे तिचे स्वारस्य जाते, तीच गोष्ट गुगलीची. गैर माहितगारावर फक्त ती परिणाम करू शकते 'गुगली' न कळली तर मात्र नाइलाजाने चाचपडत, प्रत्येक चडू टप पडेल तसा मागे किंवा पुढे, काळजीने खेळावा लागतो अयत घातक म्हणजे जो 'गुड लेंग्थ गुगली' तो पुढे बॅट हळूच उभी ठेवून जागच्या जागी अडवला म्हणजे झाले. विजय मर्चंट व विजय हझारे दोघेहि या घातक गुगलीचा प्रतिकार करण्यात अत्यंत पटाईत आहेत

५१ पाहा (३) हीच ' लेट कट् ' आपण जणू काही बॅटीने चडू हळूच खाली दावतो अशा नाजूक स्पर्शाने साधल्यास तिला ' चॉप ' म्हणतात हा टोला दिसण्यात सुदर असला तरी थोडी चूक झाल्यास यष्टिरक्षकाच्या हातात झेल जाण्याचा मोठा धोका असतो लवचिक मनगट व तीक्ष्ण नजर असल्याशिवाय ' कट ' व चाप सफाईदार मारणे कधीच साधत नाही व त्यामुळे खेळात पूर्णता व आकर्षकता येत नाही आपला पहिला जगविख्यात फलदाज रणजी सर्व तऱ्हेच्या ' कट् ' व 'लेग-ग्लाइड ' या दोन आकर्षक टोल्यामुळे इग्लडमध्ये पन्नास वर्षांपूर्वी प्रेक्षकाना मोहून टाकीत असे (४) ' कव्हर ' व ' ऑफ ड्राइव ' टोले 'ऑफ'कडे चेडू बॅटीनजीक म्हणजे हाफव्हाली ' टप्प्यावर पडला असता मारले जातात पहिला टोला चेडू यष्टीबाहेर असल्यास व दुसरा यष्टीवर जात असल्यास शक्य होतो हिरवळ (वुइकेट) टणक व सुस्थितीत असताना, या टोल्या-वर फलदाज जास्त अवलबून असतो कव्हर ड्राइव व ऑफ ड्राइव (गोलदाजाच्या पिछाडीला मारलेला) नीट साधण्यास, डावा पाय पुढे नेऊन व त्यावर शरिराचा सर्व भार देऊन खाद्यापासून दोन्ही हाताना चक्राकार गति व वेग द्यावी लागतात

( आ ) ऑन ( डाव्या बाजूचे ) टोले– (१) ऑफकडे 'कट'ला जे महत्त्व व सौंदर्य असू शकते ते आनकडे ' लेग ग्लान्स ' किंवा 'ग्लाइड'ला लाभते चेडूच्या मूळच्या वेगाचा फायदा घेऊन सफाईने व कौशल्याने त्याला वेगळी गति दिली जात असल्याने, खेळाडूला व प्रेक्षकाना आनद होतो चेडू लेगस्टपवर किंवा थोडा बाहेर वेगाने चाल करून येत असताना ऐन वेळी बॅट तिरपी करून, व हवा तितका कोन करून, चेडूची गति सहज बदलता येते सरळ यष्टीवर येणारा चडू ' ग्लाइड ' करण्याचा व त्यामुळे पायचीत होण्याचा धोका पक्की नजर चेडूवर बसल्याशिवाय पत्करू नये याहि टोल्यावर 'रणजी'चे विलक्षण प्रभुत्व होते व ते मोठमोठ्या गोल-दाजाना दिङमूढ करीत असत

( २ ) लेगस्वीप– चडू लेगबाहेर व मदगति असेल, तर तो जमिनीसपाट खराट्याने झाडल्यासारखा, म्हणजे ' स्वीप ' मारणे योग्य ठरते

व झेल जाण्याचे भय राहत नाही मात्र जर लेगब्रेक होऊन चेंडू अंगावर येत असेल तर हमखास टोला उंच चढेल व झेलाचे भय राहील. उदयोन्मुख फलंदाजाने लेगब्रेक अंगावर अगर स्टंपावर वळून येत असेल तर बचावाचे धोरण पत्करले पाहिजे असा चेंडू फार घातक असतो हें कधीहि विसरता कामा नये. उलट लेगकडे जाणारा 'ऑफब्रेक' धोक्याचा असत नाही. त्याचा खुशाल समाचार घ्यावा

( ३ ) 'हुक्' व 'पुल्' टोल्याची वर्णने आपण नेहमी ऐकतो; पण त्यातला भेद व त्याचे नक्की स्वरूप फारच थोडक्याना कळते 'पुल्' शब्दाचा अर्थ 'ओढणे' असा आहे अर्थातच ज्या वेळी चेंडू पुढे पडून यष्टयावर चाल करून येत असेल व आपणास तो लेगकडे म्हणजे डावीकडे खेचणे शक्य असेल, त्या वेळी 'पुल्'चा उपयोग करतात. लेग बाजूकडे साधारणपणे कमी क्षेत्ररक्षक असल्याने पुल् फायद्याचा ठरतो पण जर चेंडू पुष्कळ आखडलेला ( शॉर्ट ) असेल तर, उजवा पाय ऑफकडे नेऊन, हात लांब करून जसा आपण दूरचा पदार्थ आकडीने अडकवतो तसा बॅटीने चेंडू ओढून, लेगकडे टोलावल्यास त्याला 'हुक' म्हणण्याची प्रथा आहे वेगाने आपटून उडवलेले चेंडू, जर फलदाज पावरला नाही, तर हुक करून सीमापार पाठविता येतात 'बपर्स'वर 'हुक'ची ओढ असते. मात्र फलदाजात धैर्य व चापल्य उत्तम प्रतीचे पाहिजे 'हुक' करण्यापूर्वी उजवा पाय चटकन 'ऑफ'कडे नेऊन गोलदाजाच्याकडे दोन्ही डोळे व छाती वळवून, त्याच्या आपटवाराचा समाचार घेण्यास धैर्याने ताठ उभे राहिले पाहिजे. चेंडू दूर, उडलेला व आखूड टप्प्याचा असेल तरच 'हुक' शक्य होतो तसे नसल्यास 'पुल' योजावा लागतो

( ४ ) गोलदाजाच्या मागे जमिनीसपाट किंवा उचावरून 'ऑन ड्राइव्ह' करून 'ऑफ ब्रेक' किंवा सरळ 'हाफव्हाली'चा समाचार घेता येतो चेंडू मंद असेल तर पुढे उडी घेऊन व पहिला टप पकडून जोराचा टोला मारता येतो बहुतेक पट्वार याच टोल्यावर मिळतात मंद परतु फिरत्या गोलदाजीविरुद्ध हा चागला उतारा आहे

ठरते अशा वेळी शॉर्ट पडलेला चडूच फक्त, लेगकडे 'हुक' करून धावा पदरात पाडता येतात मानतर जसजस ऊन पडत जाईल तसतशी हिरवळ वाळन जाताना, चिकट (स्टिकी) होऊन चेडू, वाटेल तसे अनियमितपण वळत व उडत राहतात व खेळ तारेवरच्या कसरतीसारखा अत्यत कठीण होऊन बसतो क्रिकेटच्या भाषेत अशा हिरवळीला 'ग्लू पॉट' (डिकदाणी) अगर 'स्टिकी डॉग' (चावरा कुत्रा) म्हणतात, व ते शब्द ऑस्ट्रेलिया व हिंदुस्थान येथे पावसानतर हिरवळ फार खराब झाल्याने साथ वाटू लागतात या परिस्थितीत सर्व सघाची शेदीडशे धावापर्यंत मजल जाणे कठीण होते

## चिकट हिरवळीवर फलंदाजी

इग्लडमध्ये प्रखर ऊन पडण्याची वेळ क्वचित् येत असल्याने, चिकट मैदानावर सघाचा धुव्वा उडण्याचे प्रसग थोडे येतात स्टिकी वुइकेट वर चडू खेळण्यापेक्षा ते न खेळण्यात म्हणजे सोडून देण्यात कौशल्य व प्रसगावधान लागत स्वस्थानी निश्चल राहाणे टोलेबाजी वर्ज करण व चेडू दूर टप्पा पडून मदपणे आल्यास तेवढाच फक्त लेगकडे टोलावण एवढेच मार्ग अशा वेळी उरतात, आणि अशा वेळी, फलदाजात दम, सयम व चिकाटी किती आहेत, याची परीक्षा होते मोठ्या सामन्यात अशा कठीण प्रसगाला नीट ताड देता यावे म्हणून भिजट चिकट व मऊ जागेवर फलदाजीचा मुद्दाम सराव वारवार करण हिताचे ठरत

## उत्तम व टणक हिरवळीवर फलंदाजी

उलट चागल्या टणक हिरवळीवर पुढे जाऊन चढाईचे टोले मारून (ड्राइव्हसारखे) शक्य तितक्या जास्त धावा कमी वेळात गोळा करण्याने सघाला मजबूती आणता येते हवा अनिश्चित व पुढे पावसाचा सभव असल्यास, सधि आहे तो तडफदार टोलेबाजी करणे तापल्या तव्यावर पोळघा चटकन् भाजून घेण्याप्रमाणे इष्ट ठरते

## काथ्याच्या चटईवर (मॅटवर)

भारतातल्या ऊष्ण शतात (नागपूर काठेवाड, गुजराथ, बडोदा व इदूर-मध्ये) हिरवळ सुस्थितीत ठेवण व क्रिकेटजोगी निर्माण करणे अत्यत अवघड

होत तसेच क्रिकेटप्रेमी वेस्ट इंडीज बेटाच्या व दक्षिण आफ्रिकेच्या काही भागात, मॅटचा अवलंब करणं प्रतिकूल हवेमुळे जरूर पडते काथ्याच्या मॅटवर फलदाजीचे तंत्र दरच वेगळे आहे हिरवळ हवामानाप्रमाण कठीण, मध्यम, मऊ किंवा भुसभुशीत होऊन सामन्याचे मुदतीत बदलत जाते मॅट मात्र सर्वकाळ तशीच राहते हा एका दृष्टीने फलदाजाला फायदा आहे पण तोटा म्हणजे, तीवर चेंडू नेहमीच जास्त वळतात व उची घेतात व त्यामुळे फलदाजी फार जपून करावी लागते साधारणपणे ( 'बॅक प्ले' ) मागे खेळल्यास घोक्याचे चेंडू सोडता येतात व झेल जाण्याची भीति कमी होते मॅटवर चेंडू अनियमितपणे येत असल्याने, चढाईचे टोले– ड्राइव्ह वगैरे जपून योजावे लागतात मॅटवर चेंडूला टप्प्यानंतर भरपूर उंची मिळत असल्याने ' हुक टोला फार सोयीचा व किफायतीचा होतो तथापि एकंदर तुलनात्मक दृष्टीने पाहता नेहमीच्या सुस्थितीत, धावाचे डोंगर रचण्यास हिरवळ सोयीची असते शिवाय सर्वांच्या दृष्टीला हिरवळ आल्हाददारक, पायांना सुखकारक व मनाला उत्साहवर्धक वाटते मात्र पावसानंतर चिखल झाल्यास, कधी खेळच स्थगित होतो किंवा जमीन चिकण होऊन, फलदाज केव्हा व कोणत्या चेंडूला बळी पडेल ते सांगता येत नाही उलट मॅट जरी नेहमी-

उडण्यात होतो व फलदाजाच आयुष्य केव्हा सपुष्टात येईल त्याचा नेम नसतो अशा अवघड प्रसगी, थोडा वेळ काढून, सामना वचावावयाचा असल्यास, शक्य तितक्या मागे पाय व बॅट घेऊन खेळल्यास धोका कमी होतो व उडून सावकाश येणारे काही चडू तडकावता येतात. उलट वेळ फार असेल किंवा धावा थोड्याच करावयाच्या असतील, तर हाफव्हॉली ( पुढे टप पडलेले ) किंवा घोट्याचे ( गुडलेग्थ ) सुद्धा, उचलून रक्षकाच्या डोक्यावरून मारण्याचा प्रयत्न करावा या धाडसाने झेल उडाले तरी वेडे-वाकडे इतस्तत रक्षकापासून दूर पडतात व त्याची भेधा उडते ज्याला 'लॉग हॅंडल' म्हणजे टोलेबाजी म्हणतात त्याचा अवलब, शेवटचा जालीम उपाय म्हणून कधीकधी लागू पडतो.

## फायरी (आग ओतणारी) वुइकेट

हिरवळ फारच टणक व गवताळ असल्यास, चेडू भयकर वेगाने उडून अगावर येतात अशा वेळी 'गुडलेग्थ' नुसते अडवल्याने व बाकीचे उडून जाणारे काही वेळ ( नजर स्थिरावेपर्यंत ) सोडल्याने धोका टळतो हाफव्हॉली मात्र केव्हाहि व्यय दवडणे श्रेयस्कर नाही कारण वेगामुळे टोला जमिनीवरोवर राहील व झेल उडणार नाही उलट, पावसानतर हिरवळ फार ओली व दमट झाल्यास 'हाफव्हॉली'चा टोला वर्ज्य समजला पाहिजे, मात्र चेडू शॉर्ट ( मागे ) टपाने पडल्यास, चेडूवर जोराचा हल्ला चढवला पाहिजे फलदाजीच खरे कौशल्य प्रसग व परिस्थितीचे अवधान राखण्यात व तिला अनुरूप टोल्याची योजना करण्यात मुख्यत दिसून येते

## चटई जास्त सोयिस्कर कशी होईल ?

हिंदुस्थानात कोठे जमीन खडकाळ, खरबरीत, वालुकामय तर कोठे पाऊस अगदी कमी व पाण्याचे अत्यत दुर्भिक्ष्य, या दोन्ही सोयी काही थोड्या शहरात असल्या तर, पैशाची व इतर साधनाची उणीव अशा अनेक अडचणीमुळे मैदान हिरवेगार राखणे जवळजवळ अशक्य होते अखिल भारतात, कलकत्ता हे एकच ठिकाण असं आहे की, तेथे इंग्लडप्रमाणे उत्कृष्ट हिरवळ निर्माण करता येते इतर मुबई, मद्रास, दिल्लीसारख्या

मोठ्या शहरातहि हिरवळ दाट ठेवणं कठीण होतं आपल्या सामान्य शह-रात व त्यामधील क्लबात अर्थातच मॅटवर खेळ प्रचलित असल्याने त्यासबंधी काही सूचना देता येतील

(१) मॅट शक्य ता बारीक व मऊ विणीची निवडावी ती खरबरीत व गाठाळ असल्यास चेंडू वेडेवाकडे उडतील धोका निर्माण होईल व फलदाजाच्या मनात भीति कायमच ठाणे देऊन बसेल

(२) हल्ली तागाची (ज्यूट) चटई तयार करून मिळते व ती मऊ असल्याने चांगल्या हिरवळीप्रमाणे बिनधोक व समाधानकारक वाटते म्हणून तीवर जास्त खर्च झाला तरी फलदाजी सुधारेल व हिरवळीचा सराव होण्यास मदत होईल चटईवर खेळणारे हिरवळीवर बिचकतात, हाच प्रकार उलटहि होतो या दोन्हीच्या मधला मार्ग तागाच्या चटईत सापडेल असे वाटते पण ती फार महाग असल्याने, सामान्य क्लबाना परवडत नाही

चेंडू पुढे जाऊन न खेळता थोडे मागे सरून, निदान जागच्या जागी अडवणे विनधोक असत उडणारा किंवा वळणारा चेंडू, थाबून खेळण्याने झेल उडत नाही म्हणून मॅटवर फलंदाजानी 'गुडलेंग्थ' म्हणजे घातक चेंडू कधीहि पुढे बॅट सारून, अगर पायाची झेप टाकून, अडवण्याचा प्रयत्न करू नये. कारण वळणारा चेंडू बॅटीला चुकवून यष्टीवर तरी जाईल किंवा बॅटीला चाटून, क्षेत्ररक्षकाच्या हातात झेलला जाईल म्हणून चेंडूची फिरत पूर्ण झाल्यावरच त्याचा समाचार घ्या

( २ ) चांगली नजर असल्याशिवाय मॅटवर चेंडू कट् अगर ड्राइव्ह करू नका झेल जाण्याचा त्यात मोठा धोका असतो मला हे प्रत्यक्ष अनुभवाने सांगता येईल १९१६ साली मुंबईच्या चौरंगी सामन्यात, सुप्रसिद्ध इंग्रज गोलंदाज 'टॅरंट' विरुद्ध बाद न होता मी एका डावात ५६, तर दुसऱ्यात ७२ धावा केल्या पण त्याच्या विरुद्ध पुढे काठेवाडात मॅटवर फलंदाजी करताना, टर्फप्रमाणे मॅटवर तसाच ड्राइव्ह टोला मारण्याची चूक मी केल्याने मी सुरवातीसच झेलबाद झालो त्या वेळी मॅट व टर्फचा फरक मला नीट प्रत्यक्ष समजला ऑफकडे जास्त उडून जाणारे चेंडू मॅटवर सोडून देणे श्रेयस्कर असते

( ३ ) सामन्यात फलंदाजीस प्रथम सुरवात करताना, चेंडू कसे व किती उडतात, किती वळतात व किती वेग घेतात याचा अचूक अंदाज घेतल्याशिवाय चढाईचे टोले मारू नका

( ४ ) मॅटवर घातक बपर्सचे शस्त्र गोलंदाज सहज वापरू शकतो त्याला तोंड देण्याची तयारी सरावाने केली पाहिजे त्यासाठी 'थ्रो' पद्धतीने चेंडू आपटून व उडवून टाकल्यास, फलंदाजाला ते सोडून देण्याची अगर टोलावण्याची सवय होईल

( ५ ) मॅटवर जास्त सोपे परंतु फायद्याचे टोले म्हणजे 'पुल व हुक' हे होत चेंडू टर्फपेक्षा जास्त सावकाश व उडून येत असल्याने, चपळ फलंदाज थोडे मागे सरून, तो लेगकडे खेचू शकतो, व त्या बाजूला क्षेत्र-रक्षक कमी असल्याने धावा भराभर गोळा करता येतात कोणाकडून तरी मुद्दाम आपटून गोलंदाजी एकसारखी करवून घेऊन, हुक टोल्याचा अभ्यास करावा

रोजचे नेट प्रॅक्टिस घेताना, आपण करमणूक व व्यायाम यावर जास्त भर देतो व म्हणून आपल्या चुकाकडे हवे तितके लक्ष देत नाही. शिवाय जवळ सभोवार जाळयाचे सरक्षण असल्याने, क्षेत्ररक्षकाना झेल पकडण्याचा व चेडू अचूक अडविण्याचा बिलकुल अभ्यास घडत नाही व आपण या खेळाच्या या अत्यंत महत्त्वाच्या शाखेत कच्चे राहतो त्याचे प्रत्यतर टेस्ट सामन्यातहि आपल्या निवडक टेस्ट सघाने दर वेळी किती झेल सोडले याचे जें वर्णन आपण नेहमी वाचतो त्यावरून येईल या बाबतीत सुधारणा होण्यास आठवडयातून निदान दोन वेळा तरी जाळें बाजूस काढून, प्रत्यक्ष सामन्यातला क्षेत्ररक्षकाचा व्यूह रचून तालीम झाली पाहिजे त्यामुळे गोलदाज, फलदाज व क्षेत्ररक्षक याना आपल्या चुका नीट कळून त्या लगेच सुधारता येतील याचा अर्थ, प्रत्येक वेळचे 'नेट प्रॅक्टिस'हे सामन्याची रगीत तालीम म्हणून समजले गेले पाहिजे गोलदाजाने कोणत्या चेडूनी फलदाज फसतो व कोणते तो सहज टोलावतो याचे प्रयोग केले पाहिजेत फलदाजानेहि प्रत्येक चूक का व कशी होते याचा मनाशी अदाज बाधून ती पुढे टाळली पाहिजे साधारणपणे गोलदाजाने चार षट्कात तरी एकदा फलदाजाला बाद केले पाहिजे उलट त्याने एकहि चूक न करण्याची दक्षता घेतली पाहिजे सघाचा नेता अगर सेक्रेटरी या सरावाच्या वेळी हजर राहिला तर त्याने कोणाची प्रगति किती व दोष कोणते याची नोंद ठेवावी तज्ञ शिक्षकाने, काही वेळा समक्ष सूचना देऊन, दोष दूर केल्यास, नेट प्रॅक्टिसचा जास्त उपयोग होऊन, खेळ सुधारेल

कारण त्यात खेळातले गुण (स्कोअर) व जयापजय समजला व नोंदला जाऊ शकतो क्रिकेटच्या बाबतीत मात्र तसे होत नाही व त्यामुळे गुणदोषाकडे कोणी लक्ष देत नाही व खेळ कसातरी होतो त्यामुळे बहुतेक खेळाडू नेट-प्रॅक्टिसमध्ये बेफिकीरपणे खेळताना दिसतात ही परिस्थिति दूर होण्यास, फलदाज जर दोन वेळा बाद होईल तर त्याचा खेळ रद्द करावा तसेच जो पन्नास चेंडूत एकदाहि बाद होणार नाही त्याला जास्त पचवीस चेंडू खेळण्याची संधि द्यावी गोलदाजानाहि असेच कमीजास्त चेंडू टाकण्याचे बक्षीस द्यावे शिवाय नेहमीच्या जागी क्षेत्ररक्षक उभे करून व जाळे काढून टाकून, 'टिप् अँड रन्' किंवा 'थ्री मिस'सारख्या स्पर्धा लढवाव्यात. म्हणजे नेहमीप्रमाणे क्रिकेटचा सराव कटाळवाणा व वायफळ न होता मनोरंजन व प्रगतीच्या दृष्टीने उपयुक्त होईल क्षेत्ररक्षणाकडेहि अशीच काहीतरी चुरस निर्माण करून, जो जास्त झेल पकडील व टोले अडवून स्टंपवर नेमाने झटकन फेकील त्याला काहीतरी बक्षीस ठेवावे, तसेच झेल वेगळ्या गतीने व कोनाने फेकता येतील अशी साधने हल्ली तयार करता येतात .

हे सर्व साधण्यास अर्थातच तीन गोष्टी मुख्य आहेत पहिली म्हणजे हे सर्व शिस्तीत करवून घेणारा संघनायक अगर चालक सरावाचे वेळी हजर पाहिजे दुसरी म्हणजे त्याने मैदान व सर्व साहित्य सुस्थितीत तयार ठेवले पाहिजे व तिसरी म्हणजे निदान पधरा तरी खेळाडू एका गटाने सरावाचे वेळी हजर राहिले पाहिजेत. आपल्या बहुतेक क्लबातून शिस्त व वक्तशीरपणा कमी असल्याने, या गोष्टी होत नाहीत व सरावाने अपेक्षित प्रगति होत नाही शाळा-कॉलेजातून तरी एखादा तज्ञ शिक्षक (कोच) म्हणून सरावावर व इतर आवश्यक व्यायामावर देखरेख ठेवण्यास नियुक्त करणे अवघड व खर्चाचे होणार नाही

घराभोवती लहानसे मोकळे अंगण असल्यास, त्यात दोघातिघाना खाजगी रीतीने सराव करणे शक्य आहे नुसत्या दोन काठ्या ठरलेल्या अंतरावर ठोकून कोणत्याहि तऱ्हेच्या चेंडूने नेमबाजी करता येईल तसेच एकाने यष्टीवर गोलदाजी करावी व दुसऱ्याने तो चेंडू ऑफ अगर लेगकडेच

मारला पाहिजे अशी चुरस निर्माण करता यईल एकट्यालासुद्धा मनात असेल तर झेलण्याचा, चेंडू अचूक फेकण्याचा व टोलावण्याचा सराव करून प्रगति साधता येईल डॉन ब्रॅडमन लहान असताना घराच्या अंगणात एका उंच टाकीवर रबरी चेंडू दाडूने खाली-वर अचूक मारण्याचा खेळ एकटाच खेळत असे तसाच दुसरा ऑस्ट्रेलियन वीर ' ग्रिमेट ' टेनिस चेंडू घेऊन घराच्या हॉलमध्ये भिंतीवर तो नेम धरून फेकीत असे निरनिराळ्या तऱ्हेचे 'स्पिन्' तो टेनिस चेंडूवर प्रथम घरात स्वत शिकला क्षेत्ररक्षणात प्रगति एकट्याला केव्हाहि जास्त सोपी आहे चेंडू झेलणे व नेम मारणे ह्या क्रिया, भिंतीवर खर्चाशिवाय व दुसऱ्याच्या मदतीशिवाय सहज शिकता येतील टेनिसमध्ये तर मोठमोठे चॅंपिअन्ससुद्धा मोठ्या सामन्यापूर्वी भिंतीवर एकसारखे एकाच हाताने एकाच पद्धतीचे टोले मारून आपली कच्ची बाजू बळकट करतात क्रिकेटमध्येहि रबराचा परंतु घट्ट चेंडू वापरून असा सराव केल्यास नवशिक्याना तो फार फायदेशीर ठरेल टेनिस चेंडू खूप उंच उडू शकत असल्याने, तो वापरून अंगणात फरशीवर 'बपर्स बिनधोकपणे टाकता येतील व त कसे सोडावे अगर वळून टोलवावे याचे प्रात्यक्षिक देता येईल ज्याला ' फूटवर्क ' ( म्हणजे पायाची जलद हालचाल व तयारी ) म्हणतात ते, असे चेंडू अंगावर आले म्हणजे शिकता येईल

साथीदारावर ती जबाबदारी टाकावी. याचे मुख्य कारण, चेंडूच्या गतीवर नजर ठेवण्यात दोघांची सोय व ज्या बाजूच्या यष्टीवर क्षेत्ररक्षक चेंडू फेकील, तिकडे लवकर पोचण्याची संधि, या बाबतीत संगनमताने अवघड धाव सोपी होते इंग्लंडचे जुने वीर हॉब्स व सटक्लिफ ही जोडी धावा अशा चोरून घेण्यात प्रसिद्ध होती

( २ ) साथीदाराने गोलंदाजापाठोपाठ, धाव काढण्याच्या रेषेपुढे (पॉपिंग क्रीझ) पाचसहा पावले येऊन एकदर धावेचे अंतर कमी करावे, म्हणजे धावबाद होण्याचा धोका टाळेल शर्यतीत आघाडी मारण्याचा फायदा या चार फूट अंतर आगाऊ कापण्याच्या दक्षतेने मिळतो

( ३ ) दोघांनी अंतिम रेषेपर्यंत पोचण्यात व्यर्थ वेळ न दवडता हात लांब करून, बॅट दुरून रेषेच्या आत टेकून दुसऱ्या धावेस शक्य तर तयार राहावे

( ४ ) आपली स्वतःची तयारी व अंदाज पाहून होकार किंवा नकार साथीदारास स्पष्ट ऐकू येईल इतक्या मोठ्याने व जलदीने द्यावा बऱ्याच वेळा धावबाद होण्याची आपत्ति, गप्प राहण्याने किंवा कांकू करण्याने ओढवते हा दोष जाण्यास दोघांनी एकत्र जोडीने खेळण्याची संधि दवडू नये व धावा पळून काढण्याचा अभ्यास करावा फलंदाजांचे क्रम ठरलेले असतील, तर साध्या सामन्यातहि, अशी संधि अनेक वेळा मिळू शकेल या बाबतीत शिक्षण देण्यास, नेत्याने किंवा शिक्षकाने 'टिप् अँड रन्-'

मारला पाहिजे अशी चुरस निर्माण करता येईल एकट्यालासुद्धा मनात असेल तर झेलण्याचा, चेंडू अचूक फेकण्याचा व टोलावण्याचा सराव करून प्रगति साधता येईल डॉन ब्रॅडमन लहान असताना घराच्या अंगणात एका उंच टाकीवर रबरी चेंडू दाडूने खाली-वर अचूक मारण्याचा खेळ एकटाच खेळत असे तसाच दुसरा ऑस्ट्रेलियन वीर ' ग्रिमेट ' टेनिस चेंडू घेऊन घराच्या हॉलमध्ये भितीवर तो नेम धरून फेकीत असे निरनिराळ्या तऱ्हेचे 'स्पिन्' तो टेनिस चेंडूवर प्रथम घरात स्वत शिकला क्षेत्ररक्षणात प्रगति एकट्याला केव्हाहि जास्त सोपी आहे चेंडू झेलणे व नेम मारणे ह्या क्रिया, भितीवर खर्चाशिवाय व दुसऱ्याच्या मदतीशिवाय सहज शिकता येतील टेनिसमध्ये तर मोठमोठे चॅंपिअन्ससुद्धा मोठ्या सामन्यापूर्वी भिती-वर एकसारखे एकाच हाताने एकाच पद्धतीचे टोले मारून आपली कच्ची बाजू बळकट करतात क्रिकेटमध्येहि रबराचा परंतु घट्ट चेंडू वापरून असा सराव केल्यास नवशिक्यांना तो फार फायदेशीर ठरेल टेनिस चेंडू खूप उंच उडू शकत असल्याने, तो वापरून अंगणात फरशीवर 'बपर्स' बिनधोकपणे टाकता येतील व ते कसे सोडावे अगर वळून टोलवावे याचे प्रात्यक्षिक देता येईल ज्याला ' फटवर्क ' ( म्हणजे पायाची जलद हालचाल व तयारी )

सार्थीदारावर ती जबाबदारी टाकावी. याचे मुख्य कारण, चेंडूच्या गतीवर नजर ठेवण्यात दांपाची सोय व ज्या बाजूच्या यष्टीवर क्षेत्ररक्षक चेंडू फेकील, तिकडे लवकर पोचण्याची संधि, या बाबतीत सगनमताने अवघड धाव सोपी होते. इंग्लंडचे जुने वीर हॉब्स व सटक्लिफ ही जोडी धावा अशा चोरून घेण्यात प्रसिद्ध होती.

(२) साथीदाराने गोलंदाजापाठोपाठ, धाव काढण्याच्या रेषेपुढे (पॉपिंग क्रीझ) पाचसहा पावले येऊन, एकदम धावेचे अंतर कमी करावे, म्हणजे धावबाद होण्याचा धोका टाळेल. शर्यतीत आघाडी मारण्याचा फायदा या धाव पूर्ण अंतर आगाऊ कापण्याच्या दक्षतेने मिळतो.

(३) दोघांनी अंतिम रेषेपर्यंत पोचण्यात व्यर्थ वेळ न दवडता हात लांब करून, बॅट दुरून रेषेच्या आत टेकून, दुसऱ्या धावेस शक्य तर तयार राहावे.

(४) आपली कुवत, तयारी व अंदाज पाहून होकार किंवा नकार साथीदारास स्पष्ट ऐकू येईल इतक्या मोठ्याने व जलदीने द्यावा. बऱ्याच वेळा धावबाद होण्याची आपत्ति, गप्प राहण्याने किंवा कां-कू करण्याने ओढवते. हा दोष जाण्यास दोघांनी एकत्र जोडीने खेळण्याची संधि दवडू नये व धावा पळून काढण्याचा अभ्यास करावा. फलंदाजांचे क्रम ठरलेले असतील, तर साध्या सामन्यातहि, अशी संधि अनेक वेळा मिळू शकेल. या बाबतीत शिक्षण देण्यास, नेत्याने किंवा शिक्षकाने 'टिप् अँड रन्-' सारखे प्रयोग निरनिराळ्या मनोरंजक तऱ्हांनी मधूनमधून अमलात आणावे.

(५) दोघांनी चपळ क्षेत्ररक्षक कोणते व कोण वेगाने चेंडू फेकू शकतात, ते नीट हेरून ठेवावे. त्यांच्याकडे टोला गेल्यास जास्त काळजी घ्यावी. इतराकडे गेल्यास धाव घेण्याची संधि वाया दवडू नये. तसेच टोला जोराचा असल्यास, चेंडू लवकर क्षेत्ररक्षकाच्या हातात पोचण्याचे भय असते. अशा वेळी घाई न करता आपल्या व चेंडूच्या वेगाचा पूर्ण अंदाज घेऊन पाऊल टाकावे.

आपल्या धावा वाढविण्याच्या दृष्टीने, वरील तयारी उपयुक्त होईलच, शिवाय, अशा धडाडीच्या मार्गामुळे प्रतिपक्षीय रक्षकांची त्रेधा उडून, त्यांनी व गोलंदाजांनी योजलेले डावपेच व रचलेले व्यूह ढासळून

पडतात. शत्रुपक्षीय सैनिकात गोंधळ निर्माण करण्यास धावा चोरण्यास योजलेले हे हल्ले फार उपयोगी ठरतात

## फलंदाजींत यश कसें लाभेल ?

फलदाजाची कला तारेवरील कसरतीसारखी अवघड आहे; त्याचें कारण, लहानशाहि गलतीची क्षमा तीत केली जात नाही, व फलदाज एकदम बाद ठरविला जातो अर्थातच, उत्तम यश लाभण्यास, कौशल्या-बरोबरच शारीरिक व मानसिक आरोग्य कमावले पाहिजे त्यामुळे मन व दृष्टि एकाग्र व स्थिर राहील शिवाय, पहिल्या दर्जाच्या फलदाजाच्या तालबद्ध हालचाली पाहिल्यास, पायात चपळता किती पाहिजे हे समजेल. या उत्तम 'फूटवर्क'मुळे हवे ते पवित्रे, टोला मारण्यापूर्वी सहज घेता येतात व खेळ कलापूर्ण व सफाईदार होतो फलदाजीतल्या यशाचा खरा पाया तीक्ष्ण नजर, लवचिक मनगट व चपळ पाय हे होत; आणि या सर्वांचे नीट सहकार्य घडवून आणणारे शांत व दक्ष मन हे या सर्वांच्या सुस्थितीच्या मुळाशी आहे.

## बाद होण्याचे नऊ प्रकार

बाद होण्याचे विविध प्रकार कोणते व ते कसे घडतात याची नीट माहिती उमेदवार फलदाजाला अवश्य हवी ते प्रकार असे–

**(१) यष्टिबाद होणें**– यष्टीवरची आडवी एक विटी (बेल) जरी चेंडू लागून खाली पडली तरी फलदाज बाद ठरतो

**(२) झेलबाद**– हात जमिनीला टेकून, जरी क्षेत्ररक्षकाने बॅटीला स्पर्शून गेलेला चेंडू झेलला तरीहि फलदाज बाद ठरतो चेंडू प्रत्यक्ष जमि-

फलदाज कोठेंहि (रेषेच्या आत) असोत माञ ज्या वेळी असा फलदाज चेडू स्वत खेळत नसेल (म्हणजे तो नॉन स्ट्रायकर असेल) त्या वेळी तो खेळाच्या बाहेर असल्याने, रेषेबाहेर गेल्याने, धावबाद होत नाही

(४) 'स्टम्ड' बाद– फलदाजी करताना, खेळाडू रेषेपुढे गेल्यास यष्टिरक्षक चेडूने यष्टि पाडून त्याला बाद करू शकतो यष्टिरक्षकाशिवाय इतर कोणीहि ही गोष्ट केल्यास, फलदाज धावबादच ठरतो

(५) पायचीत बाद– या प्रकारामुळे नेहमीच असमाधानाच वातावरण निर्माण होते कारण त्यातील मुख्य गोष्ट म्हणजे चेडू यष्टिरेषेत अगर बाहेर ऑफकडे पडून बरोबर यष्टीवर जात होता का, व तो फलदाजाने मधोमध अडवला का, हा निर्णय त्या बाजूस ठेवलेल्या पचाच्या मतावर फक्त राहतो चेडूच्या जलद गतीमुळ, पच आपल्या अदाजाने हें मत देतो

(६) 'हिट वुइकेट' बाद– फलदाज चेडू मारताना अगर त्या हालचालीत जर बॅटीन, पायान, कोणत्याहि शरिराच्या व पोषाखाच्या भागाने यष्टीला स्पर्श करील व तीवरील विटी पाडील तर तो बाद ठरेल बॅटीचा तुकडा उडून तो, अगर हातमोजा, अगर टोपी जरी यष्टीवर पडेल, तरी या क्षुल्लक वाटणाऱ्या चुकीबद्दल फलदाज बाद होईल

(७) क्षेत्ररक्षकाला अडथळा (जाणूनबुजून) केल्याबद्दल बाद– क्षेत्ररक्षक झेल पकडत असताना, झेल सुटावा म्हणून फलदाज त्याला धक्का देतो, ओरडतो व दुसरा कसला तरी व्यत्यय आणतो या गुन्ह्याबद्दल बाद ठरविण्याची कडक शिक्षा ठेवली आहे हे योग्यच आहे १९५१ साली इग्रज नेता 'हटन' दक्षिण आफ्रिकेविरुद्ध याच तऱ्हेने बाद ठरला होता व त्या निकालाबद्दल बरीच उलटसुलट चर्चा झाली होती तो प्रसग ध्यानात ठेवण्याजोगा व क्वचित् घडणारा होता एक उडलेला चेडू 'हटन'ने बॅटीने अडवला व जरा उच उडून बरोबर यष्टीवर खाली पडत होता या वेळी जवळ उभा असलेला यष्टिरक्षक अर्थातच झेल घेण्यास पुढे आला इतक्यात हटनने चेडू वरचेवर बॅटीने बाजूस सारला, व अर्थातच तो झेलबाद होण्याचे टळले पण पचाने अडथळ्यासबधी नियमान्वयें त्याला बाद ठरविले! या प्रसगी हटनच्या बाजूने समर्थन असे की– ज्या अर्थी चेडू

यष्टीवर जात होता, त्या अर्थी 'हिटिंग ट्वाइस' नियमातील सवलती प्रमाणे, स्वसरक्षणार्थ तो दुसऱ्यादा टोलावण नियमबाह्य नव्हते तसा बाद होण्याचा धोका नसता तर आपण क्षेत्ररक्षकाला झेल घेण्यास अडथळा केला नसता या चमत्कारिक प्रसगी फलदाजाची की क्षेत्र-रक्षकाची सोय प्रथम पाहावयाची हा प्रश्न येतो पण सशयाचा फायदा प्रथम आरोपीला म्हणज फलदाजाला द्यावा अशी प्रथा असल्याने हटन कदाचित नाबाद ठरू सुटला असता व ते बाध झाले असते

(८) 'हिटिंग बॉल ट्वाइस'– हा अपराध जरी क्षुल्लक वाटला तरी नियमाची काटेकोर अमलबजावणी केली तर फलदाज बाद ठरतो म्हणून प्रतिपक्षाने प्रत्यक्ष विनती केल्याशिवाय एकदा खेळलेल्या चेंडूला पुन्हा टोलावू नये व ता गोलदाजाकडे ढकलून त्याला मदत करू नये मात्र जर खेळलला चेडू स्टपला लागण्याचा सभव असल तर दसहि वरून बॅटीने अगर हाताशिवाय शरिराच्या कोणत्याहि अवयवान तो चेडू अडवावा किंवा बाजूस टोलवावा देखील अस करताना बॅटीन यष्टि पडणार नाही याची काळजी घ्यावी

(९) हॅण्डल्ड बॉल– (चडूस्पर्शवाद) फुटबॉलप्रमाणे क्रिकेटमध्ये फल-दाजाने चेडू प्रतिपक्षाच्या विनतीशिवाय हाताळता उपयोगी नाही फलदा-जाने बॅटीऐवजी हाताने अवघड चडू अडवू नयत अगर तो उचलून दूर फेकून, धावा काढू नयत म्हणून हा नियम केला आहे तसा हेतु फलदाजाचा नसला तरी नियम मोडल्याची शिक्षा भोगावी लागतेच म्हणून क्षुल्लक

काही फलदाज आपला खेळ पुढे वेळेवर सुरू करण्याच्या वेळी उपस्थित राहात नाहीत या प्रमादाबद्दलहि ते नियमाप्रमाणे बाद ठरविता येतात आपली व आपल्या पक्षाची विनाकारण हानि होऊ नये व आपल्यावर ठपका येऊ नये म्हणून साध्या सामन्यातहि फलदाजाने वक्तशीरपणा प्रथम पाळला पाहिजे

## धोका टाळणें

बाद होण्याचे जे नऊ प्रकार नियमानी सांगितले आहेत त्याशिवाय आणखीहि एक प्रकार कोठेहि न सांगितलेला असा असतो व तो प्रत्येक फलदाजाला अवश्य माहीत पाहिजे तो म्हणजे पंचाच्या चुकीने बाद पंच जरी निःपक्षपाती असले, तरी काही प्रसंगी त्याना खरी वस्तुस्थिति पाहता येत नाही व म्हणून निकालांत चूक होते म्हणून होता होईल तो संशया-स्पद प्रसंग निर्माण न होण्याची सावधगिरी खेळाडूने घेतलेली बरी फल-दाजाने वारंवार उगीचच पायाने चेंडू अडविण्याचा अगर हाताने अगर बॅटीने गोलंदाजाकडे ढकलण्याचा व्यर्थ प्रयत्न करू नये तसेच कट मारताना बॅट जमिनीवर आपटून आवाज करू नये त्यामळे चेंडू बॅटीला चाटून गेल्याचा गैरसमज निर्माण होण्याला जागा होते गोलंदाजानेहि चेंडू टाक-ल्यानंतर पंचाच्या नेमके पुढे उभे राहू नये तसे केल्यास फलदाजाची चूक पंचाच्या स्पष्ट नजरेस येत नाही व संशयाचा फायदा फलदाजास मिळतो व तो स्पष्टपणे पायचीत झाला असला तरी त्याला जीवदान मिळून तो सुटतो

## सामन्यासंबंधी कर्तव्यें

खेळातल्या प्रगतीची खरी परीक्षा चुरशीच्या सामन्यात असल्याने ऐन वेळी लहानसहान गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यास सर्व तयारीवर पाणी पडते. म्हणून काय केले पाहिजे व काय टाळले पाहिजे ते लक्षात ठेवून खालील सूचना अमलात आणल्यास आणीबाणीच्या प्रसंगी घोटा उत्पन्न होणार नाही करावयाच्या गोष्टी अशा —

(१) सामन्याच्या वेळेवरच नव्हे तर अर्धा तास अगादर उपस्थित व्हा म्हणजे क्रीडांगणाची व इतर सर्व परिस्थितीची माहिती करून घेता

येईल तुमचा खेळण्याचा क्रम प्रथम असेल तर घाईने अस्थिरता व गोंधळ उत्पन्न होणार नाही जागतिक ' विंबल्डन ' टेनिस सामन्यात घाईत उशिरा येऊन एकदम कोर्टात उतरावे लागल्याने ऑस्ट्रेलियन वीर पेल्स १९४६ साली साध्या प्रतिस्पर्ध्याकडून हरल्याचे उदाहरण आहे एकहि चूक क्षम्य नसलेल्या क्रिकेटमध्ये घाई जास्तच घातक ठरते

(२) सामन्याच्या व पूर्व दिवशीसुद्धा पूर्ण विश्रांति घ्या आदल्या रात्री जागरण व अपचन होईल असा कोणताहि कार्यक्रम टाळा खेळातील एकाग्रता कमी होईल असा वादविवादसुद्धा बाजूस सारणे इष्ट आहे

(३) आपली स्वतःची बॅट बूट व इतर साधने सुस्थितीत तयार ठेवा बुटाचे खिळे झिजल्याने कठीण मैदानावर धावताना घसरून धावबाद झाल्याची उदाहरणं अनेक वेळा घडलेली आहेत दुसऱ्याचे सामान वापरणे दोघानाहि त्रासाचें व हानिकारक ठरते

(४) सामना चालू असताना खेळावर लक्ष केंद्रित करा क्षेत्ररक्षण करताना प्रेक्षकाकडे लक्ष जाऊन ऐनवेळी आलेला झेल सुटण्याचा संभव आहे १९५३ च्या चौथ्या अँग्लो ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये इंग्रज फलंदाज हटन उत्तम खेळत असताना ऐन वेळी कोसळणाऱ्या पावसाकडे लक्ष जाऊन, एकाएकी बाद झाला हे लक्षात ठेवावे

(५) सामन्यापूर्वीचा सराव रंगीत तालीम आहे, या जाणिवेने करा म्हणजे तयारी व आत्मविश्वास वाढेल

(६) दर सामन्यात आपण बाद कोणत्या चुकीने झालो, त्याची मनात नोंद करून ठेवा व ती चूक कटाक्षाने टाळा

(७) प्रत्येक चेंडू गोलंदाजाचे हातातून सुटल्यावर नीट अंदाज घेऊन, टोल्याची योजना करा अगोदर बेत व कल्पना केल्यास, फसगत होण्याची भीति आहे

(८) प्रथम फलंदाजी करताना चेंडूचा वेग, वळण, उंची तसेच प्रकाशाची तीव्रता याचा नीट परिचय होऊन दृष्टि स्थिर होईपर्यंत सावकाश खेळा पहिले चेंडू घातक असतात

(९) नेत्याच्या आदेशाप्रमाणे त्याच्याकडे लक्ष ठेवून वागा व परिस्थितीप्रमाणे त्याच्या सल्ल्याने डावपेचात बदल करा.

(१०) जयापजयापेक्षा खेळात जास्त महत्त्वाच्या सामाजिक व नैतिक गोष्टी साधावयाच्या असतात हे ध्यानात ठेवा तरच खेळातून खरा आनद मिळेल.

## टाळावयाच्या गोष्टी ( निषेध )

(१) सरळ यष्टीवर येणारा चेडू आडव्या बॅटीने कधीहि मारू नका.
(२) 'स्पिन्'च्या उलट दिशेने टोला मारू नका त्यात धोका आहे
(३) चेडू हाताने उचलून गोलदाजाकडे टाकण्याची नसती मदत करू नका हा उपकार नियमबाह्य व घातक ठरतो असे दाखले आहेत.
(४) धावा काढताना, मधली हिरवळ ( पिच ) उकरली जाऊन तुम्हालाच पुढे घातक होईल म्हणून अगदी बाहेरून धावत जा मऊ मैदानावर तर हे फार आवश्यक आहे
(५) कोणत्याहि गोलदाजाची व चेडूची अवहेलना करू नका अगदी सोपे वाटणारे चेडू फसवे ठरतात.
(६) फार बाहेर पडलेले चेडू मारण्याचे साहस करू नका असे चेडू बॅटीच्या टोकाला लागून झेल उडण्याची भीति असते
(७) समोर प्रतिस्पर्धी कितीहि प्रबळ असला तरी बिचकू नका यश मुख्यत धैर्य व आत्मविश्वास यावर अवलबून असते

★ ★ ★

# नेतृत्व

## नेत्याचे अधिकार

शरीराच्या सर्व अवयवांवर जसे मेंदूचे नियंत्रण व मार्गदर्शन असते, तसेच संघातील सर्व खेळाडूंवर नेत्याचे असले पाहिजे. तरच सर्वांच्या हालचाली व योजना संघटित व व्यवस्थित होतील. क्रिकेटच्या सामन्याला त्या वेळेपुरते युद्धाचे स्वरूप असते व कोणतेहि निर्णय त्वरित घेणे आवश्यक असल्याने अंतिम अधिकार एका व्यक्तीच्या हातात सोपवावे लागतात. सामन्याचे भवितव्य अर्थात सर्वस्वी त्याच्या हातात असते. इतकी मोठी जबाबदारी ज्याच्यावर सोपवावयाची त्याची निवड अगर नेमणूक किती कसोशीने केली पाहिजे हे समजेल.



लीडस येथील कसोटी सामन्याच्या वेळीं नाणेफेक करताना कॅ. विजय हजारे व लेन हटन

पडतील अशी शिकवण नेत्याने आपल्या उदाहरणाने खेळाडूंना दिली पाहिजे तरच सामन्यात प्रसन्न वातावरण राहील

खेळात धर्मयुद्धाचे नियम पाळले पाहिजेत व शत्रूलाहि न्यायाने व सन्मानाने वागविले पाहिजे, याविषयी सघनेत्याने पूर्ण काळजी घेतली पाहिजे प्रतिपक्षाला सारखीच साधनसामग्री, सवलत व सधि देऊन, मिळविलेल्या विजयाने गुणाची खरी कसोटी लागते व समाधान मिळते याकरिता नेता न्यायी, प्रामाणिक उदार व व्यापक दृष्टीचा असणे अत्यत इष्ट आहे

## पाहुणचाराची जबाबदारी

ज्या ठिकाणी सामना ठरलेला असतो त्या ठिकाणच्या सघनेत्याला प्रत्यक्ष खेळाशिवाय अनेक महत्त्वाच्या गोष्टीवर नजर ठेवावी लागते सामना ठरलेल्या वेळेवर सुरू व्हावा, नियमाप्रमाणे चालावा व नीट पार पडावा यासबधी त्याने दक्ष राहिले पाहिजे जरी त्याला पुष्कळ मदतनीस असले, तरी त्याची देखरेख नसल्यास, जर काही दोष उत्पन्न झाले तर त्याचा वाईट परिणाम शेवटी सामन्यावर झाल्याशिवाय राहत नाही. कित्येक क्लबातून प्रत्येक वर्षाकरिता कायम नेता निवडण्याची पद्धत असते व ती व्यवस्थेच्या दृष्टीने फारच उपयुक्त ठरते. अशा प्रसगीं नेत्याला यजमानाची कामगिरी करून पाहुणे-खेळाडूंची व्यवस्था पाहावी लागते व त्याना मैदान, त्याच्या मर्यादा, हिरवळ वगैरेची नीट माहिती, व खाण्यापिण्याची व्यवस्था शिष्टाचाराप्रमाणे करून द्यावी लागते. पुष्कळ वेळा आपण खेळाचे सामाजिक महत्त्व न ओळखता, कित्येक आवश्यक गोष्टी विसरतो प्रत्येक नेत्याने आपल्या खेळाडूंची



यशस्वी संघनायक— सी के नायडू

## खेळाडूंची निवड

मोठ्या सामन्याकरिता ज्या वेळी वीर निवडले जातात, त्या वेळी नेत्याला जरी सर्वाधिकार दिलेले नसले, तरी प्रत्यक्ष लढतीत, त्यालाच पुढाकार घ्यावा याचा असल्याने, निवड समितीचे सभासद त्याच्या-मताप्रमाणे चालतात असा प्रघात आहे अशी निवड करताना अर्थातच त्याच्या-जवळ सर्व खेळाडूंची पूर्ण माहिती हवी व तिचा त्याने उपयोग करून, इतर कोणतेहि विचार मनात न आणता व पक्षपात न करता, गुणावर नजर ठेवून निवड केली पाहिजे ही जबाबदारी नीट पार पाडण्यास, त्याने लायक उमदवाराचे निरीक्षण, अनेक चाचणी सामन्यातून केले पाहिजे व शक्य तर त्यांची परीक्षा घेतली पाहिजे तरच त्याला हवे तसे सैनिक हाताखाली मिळ शकतील व संघाचे बळ वाढेल

क्रीडांगणाबाहेर व खेळाव्यतिरिक्त ज्या अनेक जबाबदाऱ्या संघ-नेत्याला पार पाडावयाच्या असतात, त्याकरिता वर दिलेले गुण त्याच्या ठिकाणी प्रथम पाहिजेत त्यानंतर प्रत्यक्ष मैदानावर यश मिळण्यास आणखी कोणते गुण हवेत, ते पाहणे इष्ट ठरेल

तज्ञ असेल तरच, त्याच्या योजना सर्वांना पटून त्या अमलात आणणे जास्त सोपे होईल.

( २ ) तो वक्तशीर, तसेच शिस्त व संयम पाळणारा असला, तरच त्याला आपल्या हस्तकावर नीट नियंत्रण ठेवता येऊन, हवी ती कामगिरी करून घेता येईल

( ३ ) एखाद्याचे समाजात जरी स्थान श्रेष्ठ असले, तो श्रीमंत व सत्ताधीश असला, तरी तेवढ्यावर त्याने क्रिकेटसंघाचे नेतृत्व स्वीकारणे घातक ठरेल. त्याकरिता प्रत्येक नेता, खेळातल्या आपल्या गुणावर प्रथम संघात स्थान मिळवून, मग इतर सामाजिक मोठेपणा अगर लायकीवर पुढारी झाला तरच त्याचा संघ प्रबळ ठरेल कारण नेत्याला क्षेत्ररक्षणाच्या वेळी आपला वाटा इतरांप्रमाणे उचलावा लागतो व हा दुवा कच्चा ठरल्यास साखळी नेमकी त्याच जागी तुटत राहते या दृष्टीने नेत्याच्या चुकीच्या निवडीमुळे, भारतीय संघाचे १९३२, १९३६ व १९४६ च्या इंग्लंडच्या सफरीत अतोनात नुकसान झाले त्या साली नेत्याची निवड करताना, त्याच्या खेळातील गुणापेक्षा अवांतर गोष्टींना म्हणजे त्याची संपत्ति, सत्ता, निवड समितीत बहुमत वगैरेंना जास्त महत्व दिले गेले, व त्यामुळे भारतीय संघ मैदानावर फारच कमकुवत ठरत गेला



श्री. रंगा सोहनी हे श्रीयुत पी. विठ्ठल यांच्या हातून ढाल घेत आहेत.

नवीन प्रयोग व इलाज धाडसाने करून पाहावेत. अतिसावध अगर चिवट फलंदाजाला 'फुलपिच' चेंडूने किंवा टोलबाजी करणाराला साध्या व मंगळ 'हाफव्हॉली'चे आमिष देण्यास कचरू नये. अवघड चेंडूला दाद न देणारे, तरबेज फलंदाज सोप्या व साध्या चेंडूंना बेसावधपणे बळी पडल्याची अनेक

(७) नेत्याने कोणत्याहि प्रसंगी शांतता सोडू नये. एखादा सोपा झेल व तोहि ब्रॅडमनसारख्याचा सुटला असता चिडणे, रागावणे अगर हताश होणे जास्त नुकसानीचे ठरते. उलट 'तुला पुन्हा संधि मिळेल व चूक दुरुस्त होईल,' असा धीर देऊन, चूक करणाराला त्याच जागी ठेवून धीर द्यावा. त्याची त्या क्षेत्रातून बदली करण्यानं सर्वांच्या नजरेस ती शिक्षा येते व तो जास्तच निरुत्साही व खजील होतो.

(८) नेत्याला खेळासंबंधी सर्व बारीकसारीक नियमांची व रूढ प्रथांची नीट माहिती असावी. तसं नसल्यास त्याच्या संघाचे हक्क जातील व प्रतिपक्षी नसलेले मिळवील. सामन्यात कोणी प्रतिपक्षीय वीर जखमी झाला, उशिरा आला, गैरहजर राहिला अगर मुद्दाम विश्रांती घेण्यास काही सबबीनी मैदानातून वारंवार जाऊ लागला, तर त्या वेळी कोणी गैरफायदा घेणार नाही. याविषयी जे नियम आहेत, ते नेत्याने काळजीने पाहिले पाहिजेत. नियमाच्या अज्ञानाने नेता हास्यास्पद ठरल्याचं उदाहरण म्हणून १९४६च्या मुंबईत भरलेल्या पहिल्या झोनल टूर्नामेंटचं देता येईल. त्या वेळी सामना तीन दिवसांचा असताना, उत्तर विभाग संघनायक पतौडीच्या नबाबाने पहिल्या दिवशी संध्याकाळी सामना बंद होण्यास १ तास ४० मिनिटांपेक्षा कमी वेळ असताना आपल्या संघाचा डाव आटोपता घेतला. असे डिक्लेरेशन' (घोषणा) नियमबाह्य असल्याने नबाबाच्या अज्ञानाबद्दल बरीच टीका झाली. कारण, हे नबाब, पूर्वी इंग्लंडकडून टेस्ट सामन्यात खेळले होते व अखिल भारतीय संघाचे नेतृत्व स्वीकारणार होते व तशी त्याची निवड होऊन, त्याच्याकडे विलायतच्या दौऱ्याचं नेतेपण नंतर आलंहि. पण, क्रिकेटच्या साध्या नियमांची नीट माहिती नसल्याने, पहिल्या दिवशी संध्याकाळी आपल्या संघाचा डाव सर्व फलंदाज न खेळवता आटोपता घेण्यात त्यांनी नियम मोडला व त्याबद्दल त्याचं हसं झालं. शिवाय त्यांना आपला निर्णय परत घ्यावा लागला.

दृष्टीने नेत्यावरच येते कारण प्रत्येक बारीकसारीक गोष्टीचा परिणाम, सैनिकाच्या तन्दुरुस्तीवर व लढण्याच्या तयारीवर, म्हणजे प्रत्यक्ष जयापजयावर थोडाफार होत असतो म्हणून सेनापतीचे नियंत्रण प्रत्येक खेळाडूवर व व्यवस्थेतील प्रत्येक तपशिलावर असणे आवश्यक आहे क्रिकेटच्या युद्धात लहानशा चुकीचा घोर व घातक परिणाम होणे शक्य असल्याने, चुरशीच्या लढतीत, नेता गाफील राहील तर पस्तावल भारताचे संघ जेव्हाजेव्हा परदेशात टेस्ट सामने खेळण्यास गेले, त्या त्या वेळी या बाबतीत दक्षता न घेतल्याने अगोदरच कमकुवत असलेला आपला संघ जास्तच दुबळा ठरला नाच, मेजवान्या, उत्सव, समारंभ सहली वगैरेच विलोभन पाश्चात्य देशात तरुण खेळाडूपुढे नेहमीच उभे असते या गोष्टीत, तारतम्य व नियंत्रण ठेवण्याची कामगिरी नेत्यावर येऊन पडते नेता स्वत संयमी, सच्छील व शिस्तीचा असल्याशिवाय, त्याचा वचक खेळाडूवर राहणार नाही, परक्या देशात काढलेल्या मोहिमेत सैनिकाना करमणूक पाहिजे, पण त्यानी उच्छृंखल होऊ नये याला जपले पाहिजे

वर वर्णन केलेली कामगिरी, नेत्याला क्रीडांगणात संघ प्रत्यक्ष लढाईला उतरण्यापूर्वी पार पाडावयाची असते त्यानंतरचे काम प्रत्यक्ष युद्धातील डावपेचासंबधी व म्हणून जास्तच महत्त्वाचे असून, त्याला ते एकट्याच्या जबाबदारीवर नीट पुरे करावे लागत म्हणून नेता कसलेला, अनुभवी व तरबेज खेळाडू असणे, अत्यंत आवश्यक असत

## प्रत्यक्ष क्रीडांगणावरील नेत्याचीं कर्तव्यें

( १ ) त्याने खेळ सुरू होण्याच्या निदान अर्धा तास अगोदर येऊन, रणक्षेत्राची बारकाईने पाहणी करून, आपल्या संघाच्या खेळाची सुरवात कशी व कोणत्या योद्धयाच्या मदतीने करावी वगैरे बेत मनात आखले पाहिजेत सामना परक्या देशात असेल तर, ही गोष्ट फार महत्त्वाची ठरते

( २ ) आपल्या हाताखालचे सर्व खेळाडू उपस्थित असून, लढाईस उपयोगी पडतील इतक्या तन्दुरुस्तीत आहेत की नाहीत, ह स्वत नेत्याने खात्री करून ठरविल पाहिजे तीन वर्षांपूर्वी मुंबईविरुद्ध झालेल्या रणजी

करंडक सामन्यांत, महाराष्ट्र-संघातील एक गोलंदाज खेळ सुरू झाल्यावर ऐन वेळी आपला हात उचलला जात नाही व आपण आज सुस्थितीत नाही असें सांगू लागला. नेत्याने या बाबतीत खेळापूर्वी तपास न केल्याने संघाची गोलंदाजी अर्थातच कमकुवत झाली.

( ३ ) नाणेफेक होण्यापूर्वी, त्याने स्वतःच्या संघातील खेळाडूंची नावे प्रतिनेत्याजवळ व त्याची आपल्याजवळ ठेवणे इष्ट व आवश्यक असतें. अशी काळजी, चुरशीच्या सामन्यांत घेतल्याने मूळ खेळाडू कोणते व बदली घेतलेले कोणते, असा संशय व त्यावरून तक्रारीस जागा राहात नाही.

( ४ ) जर सामना स्वगृही असेल, तर त्याने पाहुण्यांना खेळाचें वेळापत्रक व इतर सर्व आवश्यक माहिती व स्थानिक नियम मागितले

(७) नेत्याने फलदाजी पत्करल्यावर, प्रथम बचाव, नंतर बळकटी व नंतर प्रतिपक्षीय गोलंदाजीची नांगी मोडून काढल्यावर हल्ला, अशा क्रमाने आपला पक्ष प्रगत होत आहे, यावर त्याची सारखी नजर ठेवावी व प्रत्येक गोष्टीत स्वतः आपण उदाहरण घालून इतरांना मार्गदर्शन करावे. वरील क्रमाक्रमाने बाजू बळकट करीत न राहता, एकदम हल्ला चढविल्यास कशी फजिती होते हे १९५३ च्या इंग्लंडवरील स्वारीत ऑस्ट्रेलियन संघ श्रेष्ठ असताहि, त्याचा जो अनपेक्षित पराभव झाला व दाणादाण उडाली त्यावरून सिद्ध झाले. नेत्याने भलते साहस अवलंबणे धोक्याचे ठरतें.

(८) फलदाजीत आघाडीस मधूनमधून डावखोरे वीर प्रतिपक्षाची गोलंदाजी व क्षेत्ररक्षण विघडविण्यास फार उपयोगी पडतात. म्हणून ते एकदम न वापरता, पेरून ठेवावे. पहिले तीन फलदाज बचावास, नंतरचे हल्ला चढविण्यास व त्यानंतरचे, टोलेबाजीने प्रतिपक्षावर तुटून पडतील व त्याची मेधा उडवतील अशा धोरणाने योजावेत.

(९) नेत्याने केव्हाहि गहाळ अगर बेफिकीर न राहता, प्रत्येक हालचालीवर नजर ठेवली पाहिजे. आपली बाजू कमकुवत व डळमळीत असताना तर, या गोष्टीला अतोनात महत्व असते. क्रिकेट लढतीच्या क्षणोक्षणी बदलत जाणाऱ्या घडामोडीकडे दुर्लक्ष झाल्यास, हातात आलेला जय सुटून गेल्याची उदाहरणे घडली आहेत.

(१०) नायकाने आपल्या स्वतःच्या फलदाजीचा क्रम अगदी आरंभी अगर शेवटी ठेवू नये. आरंभीच अपघाताने सेनापति पडल्यास इतर सैनिकांचे हातपाय गळतात. शेवटी आधाराला म्हणून तो मागे राहिल्यास आणि कोणी चांगला मदतनीस न लाभल्यास त्याला कर्तबगारी दाखविण्यास अवसर मिळत नाही व म्हणून घसरत गेलेला डाव सावरता येत नाही. त्याने विशेषतः मध्यावर किंवा ज्या वेळी घसरगुंडी होऊन धोका उत्पन्न झाला असेल त्या ठिकाणी जाऊन बाजू बळकट करण्याचा प्रयत्न करावा.

(११) फलदाजी संपून, ज्या वेळी गोलंदाजीने शत्रूवर हल्ला चढविण्याची वेळ येते, त्या वेळी नेत्याच्या गुणांची खरी परीक्षा होते. या

वरडक सामन्यात, महाराष्ट्र संघातील एक गोलंदाज खेळ सुरू झाल्यावर ऐन वेळी आपला हात उचलला जात नाही व आपण आज सुस्थितीत नाही असं सांगू लागला नेत्यानं या बाबतीत खेळापूर्वी तपास न केल्यानं संघाची गोलंदाजी अर्थातच कमकुवत झाली

(३) नाणेफेक होण्यापूर्वी त्यानं स्वतःच्या संघातील खेळाडूंची नावं प्रतिनेत्याजवळ व त्याची आपल्याजवळ ठेवणे इष्ट व आवश्यक असते अशी काळजी चुरशीच्या सामन्यात घेतल्यानं मूळ खेळाडू कोणते व बदली घेतले कोणते असा संशय व त्यावरून तक्रारीस जागा राहात नाही

(४) जर सामना स्वगृही असेल तर त्याने पाहुण्यांना खेळाचे वेळापत्रक व इतर सर्व आवश्यक माहिती व स्थानिक नियम सांगितले पाहिजेत

(५) खेळ सुरू करण्यापूर्वी पंधरा मिनिटं नाणं उडवून, प्रतिनेत्याबरोबर खेळाच्या सुरवातीची योजना आखली पाहिजे सामना धर्मयुद्धाच्या नीतीनं लढावयाचा असल्यानं स्थानिक नेत्यानं प्रतिपक्षास मैदानाच्या सर्व खाचाखोचा व खुब्या जरूर सांगाव्या नाहीतर गुण व पराक्रमाव्यतिरिक्त इतर मार्गांनी जय मिळविल्यासारखे होऊन, त्याला किंमत व त्यामुळं योग्य समाधान लाभणार नाही

(६) नाणेफेक जिंकल्यास प्रत्यक्ष खेळाची हिरवळ कशी आहे, पुढं कशी राहील व आपल्या सामर्थ्याला व डावपेचाला काय श्रेयस्कर ठरेल याचा विचार करून फलंदाजी किंवा गोलंदाजी पत्करली पाहिजे हवामान व पाऊस केव्हा दगा देईल हे आगाऊ कळणे शक्य नसल्याने सुरवातीची परिस्थिति फलंदाजीस थोडी तरी अनुकूल असल्यास नाणेफेक जिंकणारा फलंदाजीने आपल्या डावास प्रथम सुरवात करतो तसे केल्याने प्रतिपक्षास शेवटच्या डावात बिघडलेल्या हिरवळीवर न थकलेल्या परिस्थितीत फलंदाजीची अडचण सोसावी लागते व आपला तेवढा फायदा होतो असा अनुभव असल्याने, शेकडा नव्वद सामन्यात, नाणं जिंकणारा फलंदाजी पत्करतो व तेच बहुतेक प्रसंगी फायद्याचे ठरते

(७) नेत्याने फलदाजी पत्करल्यावर, प्रथम बचाव, नंतर बळकटी व नंतर प्रतिपक्षीय गोलदाजीची नांगी मोडून काढल्यावर हल्ला, अशा क्रमाने आपला पक्ष प्रगत होत आहे, यावर त्याची सारखी नजर ठेवावी व प्रत्येक गोष्टीत स्वत: आपण उदाहरण घालून इतरांना मार्गदर्शन करावे. वरील क्रमाक्रमाने बाजू बळकट करीत न राहता, एकदम हल्ला चढविल्यास कशी फजिती होते हे १९५३च्या इंग्लंडवरील स्वारीत ऑस्ट्रेलियन संघ श्रेष्ठ असताहि, त्याचा जो अनपेक्षित पराभव झाला व दाणादाण उडाली त्यावरून सिद्ध झाले. नेत्याने भलते साहस अवलंबणे थोक्याचे ठरते.

(८) फलदाजीत आघाडीस मधूनमधून डावखोरे वीर प्रतिपक्षाची गोलदाजी व क्षेत्ररक्षण विघडविण्यास फार उपयोगी पडतात. म्हणून ते एकदम न वापरता, पेरून ठेवावे. पहिले तीन फलदाज बचावास, नंतरचे हल्ला चढविण्यास व त्यानंतरचे, टोलेबाजीने प्रतिपक्षावर तुटून पडतील व त्याची त्रेधा उडवतील अशा धोरणाने योजावेत.

(९) नेत्याने केव्हाहि गहाळ अगर बेफिकीर न राहता, प्रत्येक हालचालीवर नजर ठेवली पाहिजे. आपली बाजू कमकुवत व डळमळीत असताना तर, या गोष्टीला अतोनात महत्त्व असते. क्रिकेट लढतीच्या क्षणोक्षणी बदलत जाणाऱ्या घडामोडीकडे दुर्लक्ष झाल्यास, हातात आलेला जय सुटून गेल्याची उदाहरणे घडली आहेत.

(१०) नायकाने आपल्या स्वत:च्या फलदाजीचा क्रम अगदी आरंभी अगर शेवटी ठेवू नये. आरंभीच अपघाताने सेनापति पडल्यास इतर सैनिकांचे हातपाय गळतात. शेवटी आधाराला म्हणून तो मागे राहिल्यास आणि कोणी चांगला मदतनीस न लाभल्यास त्याला कर्तबगारी दाखविण्यास अवसर मिळत नाही व म्हणून घसरत गेलेला डाव सावरता येत नाही. त्याने विशेषत: मध्यावर किंवा ज्या वेळी घसरगुंडी होऊन धोका उत्पन्न झाला असेल त्या ठिकाणी जाऊन बाजू बळकट करण्याचा प्रयत्न करावा.

(११) फलदाजी संपून, ज्या वेळी गोलदाजीने शत्रूवर हल्ला चढविण्याची वेळ येते, त्या वेळी नेत्याच्या गुणाची खरी परीक्षा होते. या

# पंच

पंच हे क्रिकेटच्या सामन्यातील नियंत्रक वरिष्ठ अधिकारी व सर्वात जास्त जबाबदारीचे व म्हणून महत्त्वाचे घटक आहेत. सामन्यात वाम मार्गाचा अवलंब होऊ नये, तो सद्भावनेने खेळला जावा, त्यात खऱ्या गुणांचे चीज व्हावे व सर्वांना न्याय मिळून, समाधानाच्या वातावरणात खेळाचा निकाल लागावा, या सर्व महत्त्वाच्या गोष्टी पंचांच्या कर्तबगारीवर आधारलेल्या असतात. म्हणून सामन्याचे यशापयश त्यांच्यावर सर्व दृष्टींनी अवलंबून


आऊट ! (बाद)


लेग बाय

## पंचाच्या खुणा


नो बॉल !


वन् शॉर्ट (१ धाव कमी)



थाम



वाइड बॉल

## पंचाच्या खुणा



बाउंडरी (चौकार)



ओव्हर बाउंडरी (षट्कार)

( २ ) प्रथम काही वर्षे तरी साध्या सामन्यात पंचाचे काम पत्करून त्याला अनुभव मिळवावा लागतो त्यामुळे त्याला कठीण प्रसंग कोणते खेळाडू डावपेच कोणते वापरतात व योग्य निकाल कसा व कोणता द्यावा या सर्व गोष्टी अवगत होतात

( ३ ) पंच जर जुना अनुभवी खेळाडू असेल तर, वरील दृष्टीनी तो उत्तमच ठरेल कारण त्याला वरील तयारी करणे जास्त सुलभ होईल शिवाय त्याला सामन्यातले अवघड व निकराचे प्रसंग स्वानुभवावरून माहीत झालेले असतात व त्या वेळी तो जास्त दक्ष राहू शकतो

( ४ ) खेळाच्या माहितीइतकीच निःपक्षपातीपणाची जरुरी खेळातील या न्यायाधीशाला लागते तो कोणत्याहि पक्षाचा, जातीचा, संघाचा अगर क्लबाचा असला तरी त्याने एकदा पंचाचा झगा अंगावर चढवला की इतर सर्व संबंध व नातीगोती तो विसरतो व तटस्थ वृत्ति स्वीकारून न्यायाधीशाची भूमिका स्वीकारतो अशी तटस्थतेची भूमिका काही वेळा न राहिल्याने एखादा पंच खेळ चालू असता खेळाडूंना सूचना देतो चुकीचे निकाल देतो टाळ्या वाजवतो व हास्यास्पद ठरतो प्रत्येक पंचाच्या आयुष्यात असे प्रसंग बरेच वेळा आल्याची उदाहरणे घडतात पण मनावर ताबा ठेवल्याने सुधारणा शक्य होते व चुकांचे प्रमाण कमीकमी होत जाते

( ५ ) त्याला अनेक गोष्टींचे अवधान सभाळावे लागते खेळ नीट नियमाप्रमाणे चालू ठेवण्याची सर्व जबाबदारी त्याच्यावर असल्याने मैदानाच्या सुरवातीच्या तयारीपासून सामन्याची शेवटची घटका होईपर्यंत सर्व घटनांवर त्याची नजर असावी लागते पंच दक्ष न राहून, दोन्ही यष्टांमधील अंतर नेहमीच्या ६६ फुटांपेक्षा कमीजास्त ठरल्याने तक्रारी उद्भवतात व पंचावर त्या दोषाचे खापर फुटते अशा चुका वारवार घडतात गोलंदाजी चालू असताना तर पंच अष्टावधानी असावा लागतो गोलंदाज मर्यादेबाहेरून येतो का रेषेच्या आत त्याचे पाय असतात का, चेंडू टाकताना मनगटाला झटका देऊन तो नियमाचे उल्लंघन करून ( थ्रो ) चेंडू फेकतो का, अन्य तऱ्हेने तो कोणतेहि नियमबाह्य वर्तन करून 'नो बॉल' टाकतो का वगैरे सर्व हालचाली पंचाने पाहून, गोलंदाजाच्या

चुकीचा फायदा फलदाजाला घेता येईल इतक्या तत्परतेने एका क्षणात निकाल सर्वांना कळेल असा जाहीर केला पाहिजे पच किती झटकन निकाल सर्वांना कळेल अशा दक्षतेने देतो, यावर त्याचे कौशल्य व अवधान ठरते फलदाजाच्याकडेहि असेच लक्ष, (विशेषत तो ज्या वेळी पायानी चेडू अडवीत असेल त्या वेळी) असावे लागते

(६) निर्णय करण्यास सर्वांत जास्त अवघड प्रसग क्रिकेट सामन्यात पाच असतात ते म्हणजे पायचीत (एल्. बी डब्ल्यू), यष्टीवर झेल, धावबाद (रनआउट), यष्टिबाद (स्टंपिंग) व कोठेहि अगदी जमिनीसरपट झेल (लो कॅच) अशा वेळी खेळाडूच्या हालचाली अत्यत जलद व पचापासून थोडयाफार दूर होत असल्याने, त्या नीट कळत नाहीत व निर्णयात चुका होऊन कोणा तरी पक्षावर अन्याय होतो व खेळाचे वातावरण बिघडते या सर्वांत, कसोटीची वेळ फलदाज पायचीत ठरविताना उद्‌भवत असते व खरा नसलेला पच मात्र अशा प्रसगी गोंधळून जात नाही 'पायचीत' नियम इतका गुतागुतीचा व सूक्ष्म आहे की, अनुभवी पचहि त्यात चुकतात शिवाय काहीहि निकाल दिला, तरी त्यामुळे कोणता तरी एक पक्ष असतुष्ट होतो पच अत्यत तज्ञ व जागरूक असेल तरच हा असतोष कमी होतो

(७) पचापैकी कोणालाहि, केव्हाहि व कोणत्याहि कारणाने जर वस्तुस्थिति नीट पाहता आली नाही अगर समजली नाही, तर त्याने सकोच न बाळगता दुसऱ्यास विचारून मग निकाल द्यावा असे केल्याने भलता निकाल व अन्याय होण्याची आपत्ति टळेल अशा वेळी त्याच्यावर चट्कन् निकाल न दिल्याची टीका झाली तरी चालेल काहीतरी चुकीचा निकाल झटपट देण्यापेक्षा सावकाश व उशिरा का होईना, बिनचूक देणे केव्हाहि जास्त श्रेयस्कर आहे समजा, पचाने 'नो बॉल' जाहीर करण्यात घाई केली व गोलदाजाने चेडू टाकलाच नाही तर, हास्यास्पद प्रसग उद्‌भवेल वाईड चेडूसबधी निकाल देण्यात घाई अतीच अनिष्ट ठरेल कारण असा चेडू फलदाजाने टोलावल्याची उदाहरणे घडली आहेत व पचाना आपला निकाल रद्द ठरवावा लागला आहे

( ८ ) ज्या ठिकाणी उभे राहिले असता सर्व वस्तुस्थिति त्याला नीट पाहता येईल अशा जागी राहण्याचा हक्क नियमानी पचाना दिला आहे म्हणून त्याने खेळावर नजर ठेवण्यात कोणताहि अडथळा असेल तर तो दूर करावा खेळाडूना मध्ये उभे राहू देऊ नये

( ९ ) आपले निकाल व सूचना खेळाडूना नीट व शक्य तितक्या लवकर कळतील अितक्या स्पष्ट खुणानी व मोठ्या आवाजाने त्याने सर्व खेळाडूस कळवाव्या नियमानी या बाबतीत ज्या सज्ञा व खुणा पचाना ठरवून दिल्या आहेत त्याचे कटाक्षाने पालन प्रत्येक पचाने केल्यास सर्वाचा त्रास वाचतो व प्रेक्षकाना खेळाची परिस्थिति अचूक समजते व गोंधळ निर्माण होत नाही 'नो बाल' वेळेवर कळल्यास फलदाज तो जोरात टोलवू शकतो धावाची व खेळातील इतर महत्वाच्या गोष्टीची नोंद ठेवणाऱ्या गणकास (स्कोअरर) पचाचे निकाल दूर अतरावरून बिनचूक कळणे अवश्य असते नाहीतर नोंदी चुकीच्या होऊन शेवटी घोटाळा निर्माण होईल

( १० ) निर्भयपणा व निर्भीडपणा हाहि एक महत्त्वाचा गुण पचाची जबाबदारी पत्करणारास अवश्य आहे १९५१ च्या अँग्लो ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये इग्रज नेता व पट्टीचा फलदाज हटन याला बाद ठरवताना पच 'डेन्हिस' याची कसोटी या बाबतीत लागली हटनच्या बॅटीला लागून चेडू यष्टीवर उडाला व तो खाली येण्यापूर्वी हटनने यष्टीवर पडू नये म्हणून बाजूस टोलावला असे करण्याचा फलदाजाला नियमाने अधिकार दिलेला असतो पण असे करण्यात त्याने यष्टिरक्षकास झेल घेण्यात अडथळा आणून आपला बचाव केला व त्यामुळे तो बाद ठरतो, असा निकाल पच डेन्हिस'ने दिला इग्रज सघाची हटन वर सर्व भिस्त असल्याने, हा निकाल फार महत्त्वाचा होता डेन्हिसने दाखविलेल्या निर्भीडतेचे कौतुक त्या वेळी झाले

( ११ ) नियमाचे उल्लघन क्षुल्लक असल, तरी त्याची पचाने लगेच दखल घेणे श्रेयस्कर ठरते उदाहरणार्थ, गोलदाजानी चेडू टाकण्याची पद्धत थोडी जरी सशयास्पद वाटत असेल, अगर तो ठरलेल्या रेघेचे अतिक्रमण थोडे जरी करीत असेल तरी पचाने तो 'नो वॉल' ठरविणे आवश्यक आहे असे केल्याने दोष मुळातच उखडून टाकता येतात व

त्याची वाढ वद पडते ' स्टप-आउट ' ( यष्टिवाद ) करताना यष्टिरक्षकाची टोपी पुढे आली म्हणून फलदाजाला तो एरवी वाद असताहि नियमाप्रमाणे नावाद ठरवावे लागल्याची उदाहरणे घडलेली आहेत

( १२ ) क्रिकेटच्या चालू नियमाप्रमाणे, पचाने विचारणा झाल्याशिवाय, आपण होऊन फलदाजास वाद ठरवू नये, मात्र आपण दिलेला निकाल न समजून तो निघून जात असल, तर त्याला परत बोलावण्याचा पचाना अधिकार नवीन नियमाने दिला आहे नियमाप्रमाणे जरूर त्या वेळीच पचानी खेळात हस्तक्षेप करावा एरवी पूर्णपणे तटस्थता स्वीकारावी.

( १३ ) पच तज्ञ असतील तर, खेळ व्यवस्थित व समाधानकारक होण्यास मदत होते, हें स्पष्ट आहे फलदाजाच्या पायाला चेंडू लागल्याबरोबर, त्याची गति फिरत वगैरे नीट न पाहता जर तो बाद ठरविला जाऊ लागला, तर त्याच्या खेळात धडाडी, आवेश व चपळता राहणार नाही व तो भीतभीत मागे सरकून बचावावर आस्त लक्ष देऊ लागेल व त्याचा खेळ निश्चितपणे बिघडेल उलट, पच चुकीचा निकाल देणार नाहीत अशी खात्री असल्यास, फलदाज मोकळेपणाने तडफेने व सफाईने आकर्षक टोले योजनेत आणू शकतो व त्याचा खेळ सुधारतो

पचाच्या हातून थोडी जरी चूक झाली तरी तिचे घोर परिणाम कसे होऊ शकतात, याचा अनुभव चुरशीच्या प्रसगी येतो चार वर्षांपूर्वी असा प्रसग भारत विरुद्ध वेस्ट इडिअन सघ याच्या मुबईतील टेस्ट सामन्यात शेवटच्या क्षणी घडल्याचे पुष्कळाच्या स्मरणात असल त्या वेळी भारताला सामना जिकण्यास अवघ्या पाच धावा जरूर होत्या एक ओव्हर म्हणजे सहा चेंडू खेळण्याची सधि जर फलदाजाला मिळाली असती, तर सामना जिकणे सभवनीय होत पण पचाने चुकीने पाचच चेंडू झाले असता व पुढे एका ओव्हरची दोन मिनिटे असताना, खेळ थाबल्याचे एकाएकी जाहीर केले व त्यामुळे हा टेस्ट जिकण्याची जी अधुक आशा भारतीय सघाला होती ती नष्ट झाली असे प्रसग अपवाद असले तरी त्यात पचानी किती दक्ष राहिले पाहिजे हा नियम कळून येतो

★ ★ ★

त्याचा टेस्ट क्रिकेटमध्ये निश्चित प्रवेश होईल तोपर्यंत अर्थातच, सर्वांचा गुणानुक्रम निश्चित ठरविणे शक्य नाही

## टेस्टमध्ये ॲशेसचा उगम

सन १८७७ मध्ये इंग्लंड व ऑस्ट्रेलियाच्या दरम्यान प्रथम टेस्ट सामन्यास सुरवात झाली ऑस्ट्रेलियाने त्या साली या खेळात जरी नुकती सुरवात केली होती, तरी पुढील पाच वर्षांत त्यांचा संघ इतका प्रबळ ठरला की त्याने १८८२ साली इंग्लंडवर स्वारी करून अत्यंत चुरशीचा सामना अनपेक्षितपणे जिंकला तो सामना शेवटपर्यंत इतका रंगत गेला की, विजय हस्तगत करण्यास इंग्लंडच्या शेवटच्या फलंदाजास फक्त दहा धावा हव्या होत्या व दोन्ही पक्ष निकराने लढत होते प्रेक्षकांची मने थराऊन गेली व काही तर बेभान होऊन मूर्च्छित पडण्याच्या बेतात आले. अशा वेळी पट्टीचे इंग्रज खेळाडू गडबडले व त्यांचा एकाएकी पराभव झाला लागलीच 'स्पोर्टिंग टाइम्स' या त्या वेळच्या लंडनच्या दैनिक पत्राने काव्यमय भाषेत त्या हरलेल्या सामन्याचे वर्णन गूढभसस्कारात केले. ते असे की, "इंग्लिश क्रिकेट त्या दिवशी गतप्राण झाले व अनेक मित्रांनी त्याची प्रेतयात्रा काढून त्याच्या शवाचे दहन केले मृताची रक्षा क्षेत्राच्या ठिकाणी म्हणजे ऑस्ट्रेलियात नेण्यात येईल" या अलंकारिक वर्णनावरून, क्रिकेटसंघ पवित्र रक्षा (ॲशेस) हस्तगत करण्यास परदेशाच्या स्वारीवर जातात व जो संघ ठरलेल्या सामन्यांपैकी जास्त सामने जिंकील त्याने 'ॲशेस' म्हणजे 'रक्षा' जिंकल्या असा वाक्प्रचार रूढ झाला या कल्पनेला थोडें तरी मूर्त स्वरूप देण्यास एक बरोबरीचे रक्षापात्र, इंग्लंडच्या लॉर्डस् मैदानाच्या प्रेक्षागृहात ठेवले आहे. पत्त्याच्या ब्रिज वगैरे खेळात जास्त गेम जिंकणारा 'रबर' मिळवितो तोच 'रबर' शब्द 'ॲशेस'ऐवजी, जास्त टेस्टविजय मिळाले असता कधीकधी लावतात

## टेस्टची संख्या व दिवस

या द्विवार्षिक कसोटी सामन्यांची संख्या व प्रत्येक सामन्याला दिलेले दिवस पूर्वी निश्चित नसत. पण गेल्या महायुद्धानंतर, इंग्लंडमध्ये ऑस्ट्रे-

ठिकाणी सर्व संघ एकत्र आणून समान परिस्थितीत खेळले गेले, तर, हल्लीच्या विस्कळित टेस्ट सामन्यांना जास्त व्यवस्थित व चुरशीचे स्वरूप येऊन, त्यात सर्वांच्या बलाबलाची खरी कसोटी लागेल व सर्वांना योग्य संधि मिळत जाईल अशी एखादी योजना साध्य होण्यास क्रिकेटचा खेळ जास्त सुटसुटीत व वेळच्या व पैशाच्या दृष्टीने कमी खर्चिक झाला पाहिजे तसे होण्यास व प्रत्येक सामन्याचा मुदतीत निश्चित निकाल लागण्यास प्रत्येक सामन्याची मर्यादा अगर शवट ठराविक दिवसावर न ठेवता षटकावर (ओव्हसवर) ठेविली पाहिजेत त्यात जास्त धावा काढणारा पक्ष विजयी ठरविण्याचा महत्त्वाचा बदल खेळाच्या नियमात केल्याशिवाय खेळात तडफ, निश्चितता व प्रेक्षणीयता येणार नाही आणि क्रिकेट ऑलिंपिक खेळाप्रमाणे सर्वत्र पसरणार नाही

लियन्स लढतील त्या वेळी प्रत्येक सामन्यास पाच दिवस, पण ऑस्ट्रेलियात सहा दिवस व दोन्ही ठिकाणी एकूण टेस्ट सामने पाच, असा प्रघात ठरला व तो सध्या या दोन राष्ट्रापुरता चालू आहे अलीकडे वेस्ट इंडिअन, दक्षिण आफ्रिकन व भारतीय क्रिकेट प्रगतिपथावर आहे असं दिसू लागल्याने या नवीन टेस्ट सामन्यात प्रविष्ट राष्ट्रानाहि पाच दिवसाच्या पाच टेस्टचा मान मिळू लागला आहे

## इंपीरिअल क्रिकेट कॉन्फरन्स

टेस्ट सामन्यावर व एकदर क्रिकेटवर नियत्रण ठेवण्यास १९०९ मध्ये 'इपीरिअल क्रिकेट कॉन्फरन्स नावाची ब्रिटन-पुरस्कृत समिति अस्तित्वात आली प्रथम इग्लड ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका हे तीन या खेळात पुढारलेले देशच फक्त, या समितीचे सभासद होते नतर १९२६ मध्ये भारत, न्यूझीलड व वेस्ट इडीज याचाहि अतर्भाव झाला नवीन निर्माण झालेल्या पाकिस्तानचाहि प्रवेश १९५२ मध्ये होऊन सध्या तरी सात राष्ट्राना या जागतिक क्रिकेट योजनेत स्थान मिळाले आहे अस असले तरी जे देश खेळात सबळ व आर्थिक दृष्टया सधन ते म्हणजे इग्लड व ऑस्ट्रेलिया, त्याच्या सामन्याला, मताला व कार्यक्रमाला प्राधान्य मिळणे स्वाभाविक आहे भारताला अर्थातच यापुढे १९५९ पर्यंत, पुढारलेल्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध टेस्ट खेळण्याची सधि मिळणार नाही भारताने आपला पराक्रम प्रत्यक्ष क्रीडागणावर प्रगत राष्ट्राशी लढून सिद्ध केल्याशिवाय त्याला टेस्ट सामन्यात गौण स्थान असेच मिळत राहील, असं वाटते गेली

ठिकाणी सर्व संघ एकत्र आणून समान परिस्थितीत खेळले गेले, तर, हल्लीच्या विस्कळित टेस्ट सामन्यांना जास्त व्यवस्थित व चुरशीचे स्वरूप येऊन, त्यात सर्वांच्या बलाबलाची खरी कसोटी लागेल व सर्वांना योग्य संधि मिळत जाईल अशी एखादी योजना साध्य होण्यास क्रिकेटचा खेळ जास्त सुटसुटीत व वेळेच्या व पैशाच्या दृष्टीने कमी खर्चिक झाला पाहिजे तसे होण्यास व प्रत्येक सामन्याचा मुदतीत निश्चित निकाल लागण्यास प्रत्येक सामन्याची मर्यादा अगर शेवट ठराविक दिवसावर न ठेवता षट्कावर (ओव्हर्सवर) ठेविली पाहिजेत. त्यात जास्त धावा काढणारा पक्ष विजयी ठरविण्याचा महत्त्वाचा बदल खेळाच्या नियमात केल्याशिवाय खेळात तडफ, निश्चितता व प्रेक्षणीयता येणार नाही आणि क्रिकेट ऑलिंपिक खेळाप्रमाणे सर्वत्र पसरणार नाही.

गेल्या महायुद्धानंतर, जे टेस्ट सामने झाले, त्यावरून पाहता, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, वेस्ट इंडीज व दक्षिण आफ्रिका हे चार देश भविष्यकाळात जवळजवळ तुल्यबळ ठरतील असे वाटू लागले आहे कारण प्रत्येकाने कधी एकावर तर कधी दुसऱ्यावर मात केली आहे. युद्धोत्तर काही वर्षे ऑस्ट्रेलिया सर्वश्रेष्ठ होता. पण त्याचा अद्वितीय वीर ब्रॅडमन याच्या निवृत्तीनंतर, गेल्या वर्षी इंग्लंडने त्याचा पराभव केला व रबर जिंकले त्याच इंग्लंडची बरोबरी चालू वर्षी म्हणजे १९५४ मध्ये वेस्ट इंडीजने केली व तत्पूर्वी तर दोन लढतीत इंग्लंडचा धुव्वा उडवला होता. पण याच वेस्ट इंडियनावर १९५१ मध्ये ऑस्ट्रेलियाने चार विरुद्ध एक असे विजय मिळविले होते दक्षिण आफ्रिकेने १९५२ साली अजिंक्य ठरलेल्या ऑस्ट्रेलियन संघास त्याच्याच मैदानावर दोन वेळा जिंकून, रबरच्या निकालात बरोबरी केली अलीकडच्या या टेस्ट निकालावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते व ती म्हणजे खेळाच्या प्रगतीत बरेच देश एकाच पातळीवर येत आहेत व खेळाच्या वर्चस्वाची मक्तेदारी एकदोघाकडेच पूर्वीप्रमाणे राहिली नाही

आतापर्यंत निरनिराळ्या देशात जे अधिकृत टेस्ट सामने झाले त्याचे निकाल पुढीलप्रमाणे आहेत.

लियन्स लढतील त्या वेळी प्रत्येक सामन्यास पाच दिवस, पण ऑस्ट्रेलियात सहा दिवस व दोन्ही ठिकाणी एकूण टेस्ट सामने पाच, असा प्रघात ठरला व तो सध्या या दोन राष्ट्रापुरता चालू आहे अलीकडे वेस्ट इंडिअन, दक्षिण आफ्रिकन व भारतीय क्रिकेट प्रगतिपथावर आहे असे दिसू लाग ल्याने या नवीन टेस्ट सामन्यात प्रविष्ट राष्ट्रानाहि पाच दिवसाच्या पाच टेस्टचा मान मिळू लागला आहे

## इंपीरिअल क्रिकेट कॉन्फरन्स

टेस्ट सामन्यावर व एकदर क्रिकेटवर नियत्रण ठेवण्यास १९०९ मध्ये 'इपीरिअल क्रिकेट कॉन्फरन्स' नावाची ब्रिटन-पुरस्कृत समिति अस्तित्वात आली प्रथम इग्लड ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका हे तीन या खेळात पुढारलेले देशच फक्त, या समितीचे सभासद होते नतर १९२६ मध्ये भारत, न्यूझीलड व वेस्ट इडीज याचाहि अतर्भाव झाला नवीन निर्माण झालेल्या पाकिस्तानचाहि प्रवेश १९५२ मध्ये होऊन सध्या तरी सात राष्ट्राना या जागतिक क्रिकेट योजनेत स्थान मिळाले आहे असे असले तरी जे देश खेळात सबळ व आर्थिक दृष्ट्या सधन ते म्हणजे इग्लड व ऑस्ट्रेलिया त्याच्या सामन्याला, मताला व कार्यक्रमाला प्राधान्य मिळणे स्वाभाविक आहे भारताला अर्थातच यापुढे १९५९ पर्यंत, पुढारलेल्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध टेस्ट खेळण्याची सधि मिळणार नाही भारताने आपला पराक्रम प्रत्यक्ष क्रीडागणावर प्रगत राष्ट्राशी लढून सिद्ध केल्याशिवाय त्याला टेस्ट सामन्यात गौण स्थान असेच मिळत राहील असे वाटते गेली

ठिकाणी सर्व संघ एकत्र आणून समान परिस्थितीत खेळले गेले, तर, हल्लीच्या विस्कळित टेस्ट सामन्यांना जास्त व्यवस्थित व चुरशीचे स्वरूप येऊन, त्यात सर्वांच्या बलाबलाची खरी कसोटी लागेल व सर्वांना योग्य संधि मिळत जाईल. अशी एखादी योजना साध्य होण्यास क्रिकेटचा खेळ जास्त सुटसुटीत व वेळाच्या व पैशाच्या दृष्टीने कमी खर्चिक झाला पाहिजे. तसे होण्यास व प्रत्येक सामन्याचा मुदतीत निश्चित निकाल लागण्यास प्रत्येक सामन्याची मर्यादा अगर शेवट ठराविक दिवसावर न ठेवता षटकावर (ओव्हरवर) ठरविली पाहिजेत. त्यात जास्त धावा काढणारा पक्ष विजयी ठरविण्याचा महत्त्वाचा बदल खेळाच्या नियमात केल्याशिवाय खेळात तडफ, निश्चितता व प्रेक्षणीयता येणार नाही आणि क्रिकेट ऑलिंपिक खेळाप्रमाणे सर्वत्र पसरणार नाही.

गेल्या महायुद्धानंतर जे टेस्ट सामने झाले त्यावरून पाहता, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, वेस्ट इंडीज व दक्षिण आफ्रिका हे चार देश भविष्यकाळात जवळजवळ तुल्यबल ठरतील असे वाटू लागले आहे. कारण प्रत्येकाने कधी एकावर तर कधी दुसऱ्यावर मात केली आहे. युद्धोत्तर काही वर्षे ऑस्ट्रेलिया सर्वश्रेष्ठ होता. पण त्याचा अद्वितीय वीर ब्रॅडमन याच्या निवृत्तीनंतर, गेल्या वर्षी इंग्लंडने त्याचा पराभव केला व रबर जिंकले. त्याच इंग्लंडची बरोबरी चालू वर्षी म्हणजे १९५४ मध्ये वेस्ट इंडीजने केली व तत्पूर्वी तर दोन

भारत विरुद्ध इग्लड

| सन | एकूण टेस्ट सामने | इग्लडने जिकले | भारताने जिकले | बरोबरीत राहिले |
|---|---|---|---|---|
| १९३२ ते १९५२ | १९ | १० | १ | ८ |

भारत विरुद्ध ऑस्ट्रेलिया

| | एकूण सामने | आस्टेलियाने जिकल | भारतान जिकले | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १९४७–४८ | ५ | ४ | ० | १ |

भारत वि वेस्ट इडीज

| | एकूण | वेस्ट इडीज | भारत | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १९४८ व १९५३ | १० | २ | ० | ८ |

भारत वि पाकिस्तान

| | एकूण | पाक | भारत | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १९५२ | ५ | १ | २ | २ |

इग्लड वि आस्ट्रेलिया

| | एकूण | इग्लड | ऑस्ट्रेलिया | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १८७७ पासून ते १९३८ पर्यंत–युद्धपूव | १४३ | ५५ | ५७ | ३१ |
| १९४६ ते १९५३ | २० | २ | ११ | ७ |
| एकूण | १६३ | ५७ | ६८ | ३८ |

ऑस्ट्रेलिया वि वेस्ट इडीज

| सन | एकूण | आस्टेलियान जिकले | वेस्ट इडीजने जिकले | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १९३० | ५ | ४ | १ | ० |
| १९५१ | ५ | ४ | १ | ० |
| एकूण | १० | ८ | २ | ० |

ऑस्ट्रेलिया वि. दक्षिण आफ्रिका

| | एकूण | ऑस्ट्रेलिया | द. आफ्रिका | बरोबरीत |
|---|---|---|---|---|
| १९४९ | ५ | ४ | ० | १ |
| १९५२ | ५ | २ | २ | १ |
| एकूण... | १० | ६ | २ | २ |

इंग्लंड वि. वेस्ट इंडीज

| | | एकूण | इंग्लंड | वेस्ट इंडीज | बरोबरीत |
|---|---|---|---|---|---|
| १९२८, १९३३, १९३४, १९३९ | युद्धपूर्व | १२ | ६ | ३ | ३ |
| १९४८, १९५०, १९५४ | युद्धोत्तर | १२ | ३ | ६ | ३ |
| | एकूण... | २४ | ९ | ९ | ६ |

इंग्लंड वि. दक्षिण आफ्रिका

| एकूण | इंग्लंड | द. आफ्रिका | बरोबरीत |
|---|---|---|---|

न्यूझीलंड हें इतराच्या मानाने फारच लहान राष्ट्र असल्याने त्याच्या सामन्याना विशेष महत्त्व दिले जात नाही हें रेट ऑस्ट्रेलियाच्या पूर्वेला नजीक असल्याने ऑस्ट्रेलियात मफरीवर गेलेले संघ न्यूझीलंडला धावती भेट देऊन एकदोन टेस्ट लढतात पण हे परत संघ अगोदरच थकलेले अस ल्याने व परत जाण्याच्या घाईत असल्याने खेळण्यात फारशी स्पर्धा उत्पन्न होत नाही तथापि न्यूझीलंडच्या वीरानी बाहेर पडून आपले कौशल्य दाखविले आहे व आपण इतराना बरोबरीची लढत देऊ शकू हे पूर्वी बऱ्याच टेस्ट लढतीत सिद्ध केल आहे

## महायुद्धपूर्व कालात शतकें

या खेळात दीर्घकालीन प्रतिस्पर्धी इंग्लंड व ऑस्ट्रेलिया हच दोन प्रमुख देश असल्याने, त्याच्या कसोटीच्या लढतींना जास्त महत्त्व आहे त्याकरिता त्यामधले काही विक्रम व उच्चांक सस्मरणीय आहेत

| | | |
|---|---|---|
| इंग्रज खेळाडूची शतक (व्यक्तिश) | | १०२ |
| " | द्विशतक | ६ |
| " | त्रिशतके | १ |
| ऑस्ट्रेलियनाची शतके (वैयक्तिक) | | १०२ |
| " | द्विशतके | ५ |

ऑस्ट्रेलियाचे

चार्ली मॅकार्टने– १९२६ साली.

डॉन ब्रॅडमन– १९३० व १९३६-३७ साली (पकी दोन द्विशतके)

टेस्टमध्ये सर्वांत जास्त भागीदारी ऑस्ट्रेलियनाची–

४५१, ब्रॅडमन व पॉन्सफोर्ड जोडीची १९३४ मध्ये

इंग्लंडच्या–

एका डावात सर्वांत जास्त सामुदायिक धावा–९०३, सात बाद, १९३८ साली

ऑस्ट्रेलियनाच्या–

एका डावात सर्वांत जास्त सामुदायिक धावा–७२९, सहा बाद, १९३० साली

| | | | |
|---|---|---|---|
| सर्वांत कमी धावा–सामुदायिक | ३६ | ऑस्ट्रेलियनाच्या | १९०२ साली |
| सर्वांत कमी धावा–सामुदायिक | ४२ | ऑस्ट्रेलियनाच्या | १८८८ साली |
| " " | ४४ | " | १८९६ " |

इंग्लंडच्या–

| | | | |
|---|---|---|---|
| सर्वांत कमी धावा– | ४५ | इंग्लंडच्या | १८८७ साली |

टेस्टमध्ये सर्वांत जास्त वैयक्तिक शतके–

डॉन ब्रॅडमन – २४ – ऑस्ट्रेलियन

हॉब्स – १२ – इंग्रज

सर्वांत जास्त धावांनी जय– इंग्लंडचा, ऑस्ट्रेलिया विरुद्ध १९३८ साली,

१ सबंध डाव व ५७९ धावांनी

# क्रिकेटमधील संस्मरणीय प्रसंग

## ( १ ) विलक्षण सामना

क्रिकेटचा खेळ इंग्रजांत किती आवडता आहे हे उत्तम प्रकारे दाखविणारा एक अभूतपूर्व सामना १७९६ साली, इंग्लंडमधील वॉलवर्थ गावी लढण्यात आला होता. हा सामना विलक्षण परंतु यथार्थ असल्याने त्याचे वर्णन एका जुन्या लेखकाने मुद्दाम लिहून ठेवले आहे. इंग्लंडकडून खऱ्या लढाईंत लढताना एक पाय तुटलेल्या लंगड्याचा एक संघ व दुसरा एक हात गेलेल्या थोटक्याचा, अशा दोन तऱ्हेच्या लष्करी पेन्शनरांच्या संघामध्ये हा क्रिकेटचा सामना झाला. प्रेक्षकांची इतकी गर्दी झाली, की, सर्व तिकिटें खपून गेली. बाहेर असलेल्या लोकांनी शेवटी दरवाजे मोडले व दंगल करून आत प्रवेश मिळवला. शेजारच्या इमारतीच्या छपरावर इतके लोक बसले, की एक मोठें छप्पर कोसळलें व खाली पागा असल्याने घोडे जखमी झाले आणि



अनेक संस्मरणीय प्रसंगाचें स्थान— ब्रेबोर्न स्टेडियम, मुंबई

इंग्रजांची क्रिकेटची आवड, खिलाडू वृत्ति व कृतज्ञताबुद्धि, तसेच 'वॉटर्लूचें युद्ध इंग्लंडने क्रीडांगणावर जिंकलें' या प्रसिद्ध उक्तीचें मर्म, या एका विलक्षण सामन्यावरूनहि दिसून येतें

## ( २ ) राउंडआर्म गोलंदाजीचा प्रारंभ स्त्रीकडून

क्रिकेट सामन्यांत गेली कित्येक वर्षें गोलंदाजी विशिष्ट पद्धतीने म्हणजे 'राउंडआर्म किंवा ओव्हरआर्म' (हात खांद्याबरोबर, किंवा उंच करून) फेंकली जाते ह्या तऱ्हेची गोलंदाजी १८२५ साली 'विलिस'

नसली, तरी तिचा उपयोग हल्ली हास्यास्पद ठरेल क्रिकेटमधील या मूल-ग्राही सुधारणेचे व तीमुळे लाभलेल्या भरभराटीचे श्रेय त्याची बहीण मिस 'विलिस'ला दिले जाते ही क्रिकेट इतिहासातील महत्त्वाची घटना, रणजितसिंहाने आपल्या पुस्तकात नमूद केली आहे

## ( ३ ) वक्तशीरपणा

१७७३ मध्ये इग्लडच्या जुन्या हॅंबलडन क्लबाच्या सामना-नोंदवहीत खालील नियम आढळतो –

"यापुढे प्रत्येक क्रिकेटसामन्याच्या वेळी, सकाळी १०॥ वाजता स्टंप लावून सर्व तयारी होईल व प्रत्यक्ष खेळ सुरू होण्यापूर्वी म्हणजे अकरा वाजण्यापूर्वी जे खेळाडू उपस्थित होणार नाहीत त्याना प्रत्येकी तीन पेन्स दंड पडेल ही जमलेली रक्कम जे वेळेवर येतील, त्यामध्ये वाटून दिली जाईल "



भारतातील तीन कुशल व यशस्वी कर्णधार—
प्रा दि ब देवधर, सी के नायडू व विजय मर्चंट

व असा चेंडू खेळला जाणार नाही व त्यामुळे धावाहि काढता येणार नाहीत, असा 'डेड' बॉलविषयक नवा नियम तेव्हापासून एम सी सी ला घरावा लागला

'डेड बॉल'संबंधी असाच एक गमतीचा प्रसंग १९२९ साली मुंबईत भरणाऱ्या अखिल भारतीय चौरंगी सामन्यात घडून आला हिंदू विरुद्ध इस्लाम अशा त्या सामन्यात इस्लामचे प्रमुख फलंदाज अबदुस्सलाम फलंदाजी करीत असताना एक चेंडू पुढे जाऊन तेथेच पडलेल्या गवताच्या काड्या उचलून टाकण्यास दहा पावले रेषेपलीकडे गेले हिंदूचे यष्टिरक्षक नवले हि चेंडू उचलून गोलंदाजाकडे टाकण्यास पुढे झाले परंतु त्यांनी वळ वळून, माग न पाहता गमत म्हणून नॅ यष्टीवर टाकला व तो नेम सहज लागून अबदुस्सलामच्या विरुद्ध एका क्षेत्ररक्षकाने रनआउटचा निकाल मागितला, व नियमाप्रमाणे पंचाने फलंदाज बाद ठरविला या निर्णयात

विनिमय व टोल्याचे कौतुक करीत उभे राहिले पंचानी या वेळी काहीहि निकाल दिला नव्हता याचा अर्थ चेंडू रद्द न होता, खेळात होता. अर्थातच या परिस्थितीचा फायदा घेऊन क्षेत्ररक्षकाने चेंडू यष्टीवर फेकला व आमचा चांगला फलदाज हलगर्जीपणामुळे धावबाद ठरला इंग्लंडच्या काउंटी सामन्यातहि अशाच गैरसमजामुळे, खेळाडू नाहक बळी पडल्याची काही उदाहरणे घडली आहेत

## (७) पतंग आणि विमणीची करामत !

क्रिकेटचे काही सामने, खेळातील स्पर्धेपेक्षा, त्या वेळी घडलेल्या अनपेक्षित घटनानी संस्मरणीय झाले आहेत असाच एक सामना १९३५ साली मुंबईत झाला त्या वर्षी 'जॅक रायडर' या सुप्रसिद्ध ऑस्ट्रेलियन वीराच्या नेतृत्वाखाली एक ऑस्ट्रेलियन क्रिकेटसंघ भारतात आला होता व मुंबईच्या स्थानिक संघाविरुद्ध त्याचा सामना चालू होता त्या वेळचे हिंदूंचे तडफदार फलदाज 'एल् पी जय' फलदाजी करीत होते व त्याचा खेळ ऐन रंगात येत होता इतक्यात शेजारच्या मैदानातून काटला गेलेला एक कागदी पतंग, 'जय' चेंडू टोलावणार तोच, पिचवर त्याच्या पुढे नेमका येऊन पडला व त्याचं लक्ष चेंडूवरून सुटून ते यष्टिबाद झाले या आकस्मिक व्यत्ययामुळे, पंचानी तो चेंडू रद्द ठरवून, फलदाजाला खेळ पुढे चालू ठेवण्याची परवानगी दिली व 'जय'नी आपले वैयक्तिक शतक पुरे केले 'जय'नी तो चेंडू खेळण्याचा प्रयत्न केला असल्याने प्रतिपक्षीय नेत्याला या निर्णयाविरुद्ध कदाचित्

मुख्य प्रश्न म्हणजे त्या वेळी चेंडू 'डेड' ( रद्द ) झाला होता का? जर फलदाजाने पचाना अगर दुसऱ्या कोणासहि आपण हिरवळ साफ करण्यास पुढे जात आहों असे दर्शविले असते, अगर तसा त्याचा हेतु आहे असे पचाला कळले असते तरच तो नाबाद ठरला असता अशा उदाहरणावरून एक गोष्ट स्पष्ट होते, ती म्हणजे फलदाजाने थोडासुद्धा संशय व धोका स्वतःस उत्पन्न होईल, असे कोणतेहि नियमबाह्य कृत्य करू नये

## ( ५ ) 'हिट-वुइकेट'च्या विचित्र तऱ्हा

अकल्पित तऱ्हेने 'हिट वुइकेट' नियमान्वये फलदाज बाद झाल्याची उदाहरणे प्रत्यक्ष घडली आहेत इंग्लंडच्या स्थानिक मोठ्या सामन्यात बॅटीचा तुकडा चेंडूच्या दणक्याने उडून, तो स्टंपावर आदळून 'बेल' पडल्याचे तीन प्रसंग घडले आहेत फलदाज अर्थातच नाहक बाद झाल्याने मोडकी व फुटकी बॅट वापरणे धोक्याचे असते हे यावरून सिद्ध झाले या-पेक्षाहि विचित्र तऱ्हा १९२१ च्या लीडस् शहरी झालेल्या ॲंग्लो-ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये, 'ड्यूकेट' नावाच्या फलदाजाच्या बॅटीचा तुकडा उडून तो 'बेल'वर आदळला व पुढे चेंडू झेलला गेला तेव्हा फलदाज झेलबाद का 'हिट वुइकेट' बाद असा वाद उपस्थित झाला बॅटीचा तुकडा यष्टीवर पडण्याची क्रिया प्रथम झाली असल्याने हिट वुइकेट हा निकाल अशा वेळी जास्त बरोबर होतो क्रिकेटच्या इतिहासात मोठे सामने खेळताना चेंडू मारीत असताना टोपी यष्टीवर पडून, फलदाज बाद झाल्याची दोन ठळक उदाहरणे घडली आहेत खेळताना वस्त्रप्रावरणादिक बारीकसारीक गोष्टी-

फडकावले व परत पहिल्या सामन्याच्या क्षेत्ररक्षणास ते हजर झाले हे दोन्ही सामने साधे असले तरी दोन्ही ठिकाणी स्वतत्र शतके काढण्याचा हा विक्रम क्रिकेटच्या इतिहासात खास अविस्मरणीय ठरला

## (१०) क्षेत्ररक्षणाची महती

क्रिकेटच्या खेळात उत्तम क्षेत्ररक्षणाची महती नेहमीच प्रत्ययास येते या क्षेत्रात जो संघ प्रबळ, तो हमखास विजयी होतो १९११ साली मी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये विद्यार्थी असताना, नॉर्थकोट शील्डसाठी खेळल्या जाणाऱ्या अटीतटीच्या अत्य सामन्यात आमची मुंबईच्या अत्यंत प्रबळ झेविअर कॉलेज संघाशी गाठ पडली ओली हिरवळ, विपरीत हवा व नाउमेद करणारे प्रेक्षक अशा अनेक सकटाना आम्हाला तोंड द्यावे लागले व जय मिळणे जवळजवळ अशक्य होते अशा वेळी अत्यंत निर्धाराने व दक्षतेने क्षेत्ररक्षण करून, आमच्या संघाने प्रतिपक्षाचे विसापैकी वीसाहि बळी, सर्व झेल अचूक पकडून, घेतले व विजयश्री खेचून आणली जयाप-जयाचे पारडे सारखे खालीवर होत राहिल्याने, एक झेल जर सुटता तर तो घातक ठरला असता क्षेत्ररक्षणाचे महत्त्व इतक्या स्पष्टपणे यापूर्वी क्वचितच दिसून आले असेल

## (११) शेवटच्या चेंडूपर्यंत अनिश्चितता

क्रिकेटमध्ये अशी एक म्हण आहे, की प्रतिपक्ष ज्या क्षणी सामना हरेल त्या क्षणी फक्त आपण जिंकला असे समजावे, तत्पूर्वी बिलकुल नाही असा एक प्रसंग १९२० साली मी चौरंगी सामन्यात पारशी संघाविरुद्ध हिंदूकडून खेळताना घडून आला आम्ही पहिल्या डावात ४०८ धावाचा कोट रचला व प्रतिपक्षास लवकर उखडून, दुसऱ्या डावास आव्हान केले व त्याचे नऊ बळी झटपट घेऊन, विजयोत्सव साजरा करण्याची तयारी केली पारश्याच्या शेवटच्या जोडीत, त्याचे वृद्ध नायक डॉ कांगा पाय दुखावल्याने कदाचित् खेळलेहि नसते पण पराभव टाळण्याचा शेवटचा, निकराचा उपाय म्हणून 'रनर' घेऊन, ते लगडत, कसे तरी फलंदाजीस सिद्ध झाले व आश्चर्याची गोष्ट म्हणजे, आमच्या सर्व डावपेचाना व माऱ्याला यशस्वीपणे तोंड देऊन, त्या शेवटच्या पारशी जोडीने तब्बल साडे-

## (८) रणजींचा नीचांक!

क्रिकेटच्या खेळात जो आकर्षकपणा आहे त्याला एक कारण म्हणजे त्यातील अनिश्चितपणा नेहमीच्या आयुष्यात सुखदुःखाचे चढउतार प्रत्येकाला सोसावे लागतात, तीच गोष्ट क्रिकेट-जीवनात मोठ्या नामांकित खेळाडूनाहि अनुभवावी लागते म्हणूनच या खेळाला 'गेम ऑफ ग्लोरिअस अन्सर्टन्टी' असे म्हणण्याचा प्रघात आहे गेल्या शतकाच्या अखेरीच्या काळात भारतीय क्रिकेटपटु रणजित सिंह याने इंग्लंडमध्ये लागोपाठ तीन वर्षे अनेक उच्चांक निर्माण करून, पट्टीचे खेळाडू म्हणून नाव गाजविले होते अर्थातच ज्या वेळी रणजी इंग्लंडहून परतून, पुण्यात एका सामन्यात खेळणार असे पुणेकर क्रीडाप्रेमिकांनी ऐकले त्या वेळी पुण्याच्या पूना क्लब-वर १८९८ साली तो प्रेक्षणीय सामना पाहण्यास अतोनात गर्दी लोटली ज्या वेळी रणजी फलदाजी करण्यास मैदानावर उतरले, त्या वेळी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला पण क्रिकेटने पूर्वी कधीहि दाखविला नसेल इतका चंचलपणा या प्रसंगी दाखविला व रणजी दोन्ही डावात एकहि धाव न काढता एकाएकी बाद झाले व प्रेक्षकाचा अतिशय विरस झाला रणजींच्या क्रिकेट-जीवनात जसे अनेक उच्चांक निर्माण झाले होते, तसाच हाहि एक उलट म्हणजे 'नीचांक' घडून आला, व या खेळाचा लहरीपणा प्रत्ययास आला

## (९) अेकदम दोन शतकें

रणजींच्या ऐन उमेदीत इंग्लंडमध्ये एकाच दिवसात परंतु दोन वेगळ्या सामन्यात व दोन वेगळ्या मैदानावर वैयक्तिक शतके काढण्याचा योग अकल्पितपणे घडून आला व त्यामुळे खेळावरील त्यांचे असामान्य प्रभुत्व इंग्रजांच्या नजरेत भरले एका सामन्यात त्यांनी नेहमीच्या तडफदार खेळाने उपाहाराच्या वेळेपूर्वी आपले शतक पुरे केले व नंतर बाद झाल्यावर ते शेजारच्या मैदानावर चालू असलेला दुसरा सामना पाहण्यास सहज गेले त्या वेळी तेथील संघाचा एक खेळाडू आजारी झाल्याने तेथील नेत्याने रणजींना 'खेळनोस का?' म्हणून विचारले रणजींनी ते आमंत्रण स्वीकारून, फलदाजी पत्करली व तेथेहि दोन तासात आपले शतक पुन्हा

फडकावल व परत पहिल्या सामन्याच्या क्षेत्ररक्षणास ते हजर झाले हे दोन्ही सामने साधे असल तरी दोन्ही ठिकाणी स्वतंत्र शतक काढण्याचा हा विक्रम क्रिकेटच्या इतिहासात खास अविस्मरणीय ठरला

## (१०) क्षेत्ररक्षणाची महती

क्रिकेटच्या खेळात उत्तम क्षेत्ररक्षणाची महती नेहमीच प्रत्ययाला येते या क्षेत्रात जो संघ प्रबळ तो हमखास विजयी होतो १९११ साली मी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये विद्यार्थी असताना, नॉकआउट शील्डसाठी खेळल्या जाणाऱ्या अटीतटीच्या अंत्य सामन्यात आमची मुंबईच्या अत्यंत प्रबळ झविअर कॉलेज संघाशी गाठ पडली ओली हिरवळ, विपरीत हवा व नाउमेद करणारे प्रेक्षक अशा अनेक संकटांना आम्हाला तोंड द्याव लागल व जय मिळणे जवळजवळ अशक्य होत अशा वेळी अत्यंत निर्धाराने व दक्षतेने क्षेत्ररक्षण करून, आमच्या संघाने प्रतिपक्षाचे विसापैकी वीसहि बळी, सर्व झेल अचूक पकडून, घेतले व विजयश्री खेचून आणली जयापजयाचे पारडें सारखें खालीवर होत राहिल्याने एक झेल जर सुटता तर तो घातक ठरला असता क्षेत्ररक्षणाच महत्त्व इतक्या स्पष्टपणे यापूर्वी क्वचितच दिसून आले असेल

## (११) शेवटच्या चेंडूपर्यंत अनिश्चितता

क्रिकेटमध्ये अशी एक म्हण आहे, की प्रतिपक्ष ज्या क्षणी सामना हरेल त्या क्षणी फक्त आपण जिंकलो अस समजाव तत्पूर्वी बिलकुल नाही असा एक प्रसंग १९२० साली मी चौरंगी सामन्यात पारशी संघाविरुद्ध हिंदूंकडून खेळताना 'घडून आला आम्ही पहिल्या डावात ४२८ धावांचा कोट रचला व प्रतिपक्षास लवकर उखडून दुसऱ्या डावास आव्हान केले व त्याचे नऊ बळी झटपट घेऊन, विजयोत्सव साजरा करण्याची तयारी केली पारश्यांच्या शेवटच्या जोडीत त्यांचे वृद्ध नायक डॉ कागा पाय दुखावल्याने कदाचित खेळलेहि नसते पण पराभव टाळण्याचा शेवटचा, निकराचा उपाय म्हणून रनर' घेऊन ते लगडत कसे तरी फलदाजीस सिद्ध झाले व आश्चर्याची गोष्ट म्हणजे आमच्या सव डावपेचांना व माऱ्याला यशस्वीपणे तोंड देऊन, त्या शेवटच्या पारशी जोडीने तब्बल साडे-

तीन तास बचाव केला व आमच्या तोंडचा घास पळविला. सामन्याचा तो शेवटचा दिवस असल्याने, अर्थातच तो बरोबरीत सोडावा लागला. लगड्याने पर्वत सहज ओलांडून जावे, असाच तो पराक्रम होता. क्रिकेटमध्ये शेवटचा चेंडू टाकला जाईपर्यंत काय उलथापालथ होईल हे सांगता येत नाही हेच खरे.

## (१२) लागोपाठ पांच चेंडूंत पांच बळी !

क्रिकेटच्या युद्धात, क्वचित् प्रसंगी अनपेक्षित गोष्टी व चमत्कार घडून येतात. त्यामुळे प्रबळांनी वृथाभिमान व दुर्बळांनी निराशपणा कधीच पत्करू नये असे दिसून येईल. माझ्या क्रिकेट-आयुष्यात असा एक अविस्मरणीय प्रसंग १९३२ साली पुण्यात पी वाय् सी जिमखान्यातर्फे मी अहमदनगर क्रिकेट क्लबाविरुद्ध खेळत असताना घडून आला. पावसाळी हवेमुळे, प्रथम आमच्या फक्त ६० धावा झाल्या व प्रतिपक्षाने पाच बाद ५५ धावा सहज करून टाकल्या व जय निश्चित केला. अशा वेळी, शेवटचा प्रयत्न म्हणून, नेता या नात्याने मी निश्चयाने गोलंदाजी हाती घेतली व तीत मला कल्पनेबाहेर यश येऊन, शेवटचे पाचहि बळी मी लागोपाठ पाच चेंडूत घेतले व सामना आम्ही पाच धावांनी जिंकला. मी पट्टीचा गोलंदाज नसताहि, मोठ्या सामन्यात हा विक्रम घडून आला हे विशेष आश्चर्य. साधारणपणे तीन बळी लागोपाठ तीन चेंडूत पडले की 'हॅट ट्रिक' होते व तो कौतुकाचा पराक्रम समजला जातो. त्याकरिता बक्षीस देण्यास पूर्वी इंग्लंडमध्ये हॅट फिरवली जात असे व म्हणून या कौशल्यास (ट्रिक) 'हॅट ट्रिक' म्हणतात. अशा पाच चेंडूंनी लागोपाठ पाच बळी घेतल्याचे उदाहरण मोठ्या सामन्यात घडल्याचे नमूद नाही व त्यासाठी वेगळा शब्दहि अर्थातच नाही.

## (१३) अकल्पित झेल पकडला !

क्रिकेट सामन्यात सोपे झेल क्वचित् सुटतात व अवघड, अशक्य वाटणारे पकडले जातात. असे विचित्र प्रसंग १९२८ साली आम्ही पुण्याच्या पी. वाय्. सी. जिमखान्याचे काही खेळाडू दक्षिण हैद्राबादमध्ये तेथील क्रिकेट टूर्नामेंटमध्ये अंत्य सामन्यात खेळताना घडून आला. आमच्या

प्रतिपक्षाने फलदाजीस सुरवात केली असताना, नेत्याच्या उत्साहाने मी अगदी जवळ पॉइंटवर (दहा फुटाच्या अंतरावर) झेल पकडण्यास सज्ज झालो. त्यामुळे चिडून फलंदाजाने नेहमीची पद्धत सोडून, टोलेबाजी करण्यास एकदम वॅट फिरवली, पण तो टोला समोर न जाता, बॅटीवरून निसटून अचानक माझ्या डोळ्यावर, मला नीट न दिसता गोळीप्रमाणे आदळला! पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे माझ्या डोळ्याला मुळीच दुखापत झाली नाही, एवढेच नव्हे, तर वरील हाडावर लागून चेंडू उंच उडाला व माझ्या शेजारी स्लिपमध्ये क्षेत्ररक्षण करीत असलेल्या सी के नायडूच्या हातात जाऊन, तो फलदाज, कोणाचीहि कल्पना नसताना झेलबाद होऊन तबूत परतला नाजूक डोळ्याच्या रक्षणाला निसर्गाचे पेटीसारखे कवच किती मजबूत असते हे अशा प्रसंगाने प्रत्यक्ष कळून आले

## (१४) हिरा हरवला!

जुन्या भारतात, राजेमहाराजांनी क्रिकेटला थोडेफार उत्तेजन व आर्थिक मदत केली असली तरी आपल्या लहरीपणामुळे नुकसानहि पुष्कळ केल्याचे दिसेल. पतिआळाचे माजी महाराज अशापैकी एक होते व ते इंग्लंडच्या एम् सी सी संघाविरुद्ध भारतात फलदाजी करीत असताना घडलेला एक मनोरंजक व विचित्र प्रसंग एका इंग्रज खेळाडूने आपल्या आठवणीत मुद्दाम लिहून ठेवला आहे. टोला मारण्यापूर्वी आपल्या कानात लोंबणाऱ्या डुलाला डावा हात लावण्याची महाराजांना खोड होती गोल-दाज चेंडूफेक करण्यास धाव घेत असताना, महाराज यष्टीच्या बाजूस झालेले पाहून तो एकदम थबकला व सर्वजण गोंधळून गेले आपल्या डुलातील अति मौल्यवान हिरा पडल्याचे महाराजांना कळून आल्यावरोबर खेळ तर थांबलाच, पण मैदानावर धावपळ व शोधाशोध झाली. नंतर काही वेळाने हिरा सापडल्यावर खेळ चालू झाला संघातील एका इंग्रज खेळाडूने आपल्या आठवणीत विनोदाने लिहून ठेवले आहे, की पहिल्या दर्जाच्या सामन्यात घडलेल्या या विचित्र घटनेची आठवण म्हणून, (जर तो हिरा मला सापडला असता तर) मी तो स्वत जवळ जपून ठेवला असता

## (१५) अविस्मरणीय 'नीचांक!'

पाऊस पडून, हिरवळ भिजून नंतर चिकट झाली की ती चावऱ्या कुत्र्या-प्रमाणे फलदाजाला घातक ठरते, म्हणून तिला 'स्टिकी डॉग' म्हणण्याचा प्रघात आहे. जगात उत्कृष्ट पिचपैकी एक म्हणून पूर्वी अतिप्रसिद्ध असलेल्या पूना क्लबच्या हिरवळीवर १९१२ साली पावसानंतर झालेल्या एका चौरंगी दंगलीतील एका सामन्यात ऑस्ट्रेलियन गोलदाज 'फ्रॅंक टॅरंट' याने मुस्लिम फलदाजांची जी त्रेधा उडवली तीवरून एरवी उत्कृष्ट असलेली हिरवळ पावसानंतर किती बिघडते याचे मला प्रत्यंतर आले. त्या वेळी इस्लाम संघ बल्यांपैकी असतानाहि त्याची इतकी घसरगुंडी झाली, की त्याच्या पहिल्या डावात अवघ्या २१ धावा होऊन सर्व कारभार पाऊण तासात आटोपला! लक्षात ठेवण्याजोगी घटना म्हणजे अकरापैकी नऊ फलदाज शून्यावर परतले होते व सर्वांत जास्त म्हणजे नऊ धावा (एक्स्ट्रॉ) यष्टिरक्षकाच्या चुकीमुळे मिळाल्या होत्या. प्रत्येकाच्या वाट्याला सरासरीने एकहि धाव लाभली नाही. खेळण्यापेक्षा फलदाजांना जाण्यायेण्यात जास्त वेळ लागला. वरिष्ठ भारतीय क्रिकेटमध्ये जसे काही उच्चांक झाले आहेत तसा हा 'नीचांक' म्हणून नमूद करण्याजोगा अविस्मरणीय प्रसंग त्या वर्षी घडून आला.

टाकून त्यांना बोट पकडावी लागली. आफ्रिकन खेळाडू इतके मंद व चिकटपणे खेळले की ज्या कांहींनी वैयक्तिक शतक काढलें त्यांना प्रत्येकी सहा तासावर वेळ लागला. त्याचा सुरवातीस तर दोन तासांत एकहि चौकार नव्हता. एकदर धावांची, दिवसांची, सयपणाची, गोलंदाजाच्या षटकांची या वेळी कमाल संख्या झाली व या सर्व तऱ्हेचे उच्चांक एकूण पधरा या अविस्मरणीय टेस्ट सामन्यात घडून आले, असें त्या सालच्या 'विस्डेन' नादचुकांत नमूद झालें आहे. त्या दिरंगाई व ढिलाईमुळे अर्थातच, फारफार तर सहा दिवसांच्यावर वेळ कोणत्याहि सामन्यास न देण्याची प्रथा सुरू झाली व खेळांत जास्त तडफ येऊं लागली.

## (१७) भारताचे कांही नमूद करण्याजोगे उच्चांक

जागतिक क्रिकेटमध्ये भारत अजून बराच मागासलेला असला, तरी कांही नमूद करण्याजोगे उच्चांक त्याच्या वाट्यास आले आहेत. त्यातले कांही विशेष कौतुकास्पद आहेत, ते असे—

(अ) १९४६ साली रणजी करंडक सामन्यात होळकर संघा विरुद्ध बडोदा संघाकडून अंत्य सामना खेळतांना, 'विजय हझारे व गुल महमद' या जोडीनें जी ५७७ धावांची भागी दारी केली व वैयक्तिक गुलमहमद ३१९ धावा व हझारे २८८ असे दणदणीत आकडे फळ्यावर चढवले व कौतुकास्पद पराक्रम केला, ती जागतिक क्रिकेटमध्ये



गुलमहमद

अजून तरी उच्चांक समजला जाईल त्या खालोखाल जाड विश्रम ५५५ धावाचा 'होम्स व सटक्लिफ' या 'यॉर्कशायर' परगण्याच्या जोडीने १९३२ साली एसेक्स विरुद्ध फडकावला होता

(आ) १९४८ साली महाराष्ट्राकडून वेस्टन इंडिया स्टेटसविरुद्ध रणजी करडक सामन्यात खेळताना, बी बी निंबाळकर यांनी स्वत च्या ४४३ धावा करून, भारतीय क्रिकेटमध्ये उच्चांक निर्माण केला निंबाळकर इतक्या धावा करूनहि नाबाद राहिले असल्याने डान ब्रॅडमनचा अनुल्लंघनीय समजला गेलेला ४५२ धावाचा प्रचड तट ओलाडून जाण्याला त्याना फक्त दहा धावाची जरुरी होती व एका भारतीय क्रिकेटपटूला तो जागतिक मान मिळेल अशी सर्वांना खात्री होती पण अशा सुप्रसगी, प्रतिपक्षीय नेत्याने एका भारतीयाला अशी सधि मिळू नये या कुबुद्धीने पुढे खेळण्याचे नाकारले व रणातून पळ काढला ! भारतीय क्रीडाक्षेत्रात हाहि एक उलटा म्हणजे लज्जास्पद खरा 'नीचांक' समजला जाईल महाराष्ट्राने त्या वेळी ४ बाद ८२६ धावाचा, भारतात अजून कोणी न रचलेला, आकडा प्रस्थापित केला

(इ) १९४८ हे साल, मुबई विरुद्ध महाराष्ट्र या उपांत्य रणजी

## (१८) सरासरी २०१ धावा !

मुंबई शहराकडून रणजी करंडक सामन्यात गेली बारा वर्षे खेळत असलेल्या रुसी मोदीचा १९४३ व १९४४ सालचा पराक्रम इतका श्रेष्ठ होता, की त्याची बरोबरी होण्याची शक्यता फारच कमी दिसते मोदीने त्या दोन वर्षांत रणजी करंडकाच्या सात सामन्यात सात वैयक्तिक शतके काढली ती अशी– १९४३ मध्ये महाराष्ट्राविरुद्ध १६८ धावा व वेस्टर्न इंडिया स्टेटसविरुद्ध १२८ धावा नंतर १९४४ साली सिंधविरुद्ध १६०, वेस्टर्न इंडिया स्टेटविरुद्ध २१०, बडोद्याविरुद्ध २४५,



## (१९) एकाच डावांत ११ षट्कार !

सर्वसाधारण प्रेक्षकाना षट्कार जेव्हा उच हवेतून तरगत सीमपलीकडे पडतात तेव्हा त टोले सर्वांत जास्त आकर्षक वाटतात असे टोले सर्वात जास्त एका सामन्यात कोणी मारले ह नमूद झाले आहे सीमापार पहिला टप पडला तरी त्या टोल्यास १९१० पर्यंत सहा धावा न देता पाचच दिल्याचे उल्लेख आहेत इग्लडचा अति प्रसिद्ध जुना खेळाडू डब्ल्यू जी ग्रेस' याने अशा रामटोल्यास सहा धावा द्याव्या अशी सूचना प्रथम केली व ती मान्य झाली तत्पूर्वी १९०० साली, टोलेबाजी करण्यात पटाईत असलेल्या 'जेसप'ने पधरा षट्कार एकाच डावात मारले होते व हा अजून उच्चांक आहे त्यानतर सी के नायडू, सी जे बारनेट, ए डब्ल्यू वेलार्ड व जी जे व्हिटॅकर' या चार तडकदार फलदाजानी एका डावात अकरा षट्कार ठोकल्याचा विक्रम केला आहे १९२६ साली गिलिगनच्या नेतृत्वाखाली भारतास प्रथम भेट देणाऱ्या एम सी सी सघाविरुद्ध हिंदु सघाकडून खेळताना सी के नायडूनी अप्रतिम टोलेबाजी करून एकाच डावात वैयक्तिक दीड शतक व त्यात अकरा दणदणीत षट्कार मारून भारता-

## (२१) शेवटच्या जोडीचा अपूर्व विक्रम

क्रिकेट सामन्यात शेवटच्या फलदाजाची जोडी खेळू लागली म्हणजे डाव आटोपला असे साधारणपण समजण्यात येते पण याला कवळ अपवादच नव्हे तर आघाडीच्या जोडीला शोभणारा विक्रम भारताच्या शवटच्या जोडीने १९४६ साली इग्लडच्या स्वारीत केलेला आहे सरे परगण्याविरुद्ध खेळताना भारताची शेवटची जोडी– चदू सरवटे व शूटे बानर्जी एकत्र जमली त्या वेळी भारताचा आकडा नऊ बाद २०५ धावा इतकाच फक्त होता व अर्थातच ज्याची आशा नव्हती पण अशा अवघड प्रसगी या वीरद्वयाने धैर्याने लढत राहून स्वतःची शतके करून एकदर २४९ धावांची भर घातली व तीमुळे भारताने तो सामना डुमच्या डावाने नऊ बीर राखून सहज जिकला शेवटच्या जोडीने २४९ धावा व वैयक्तिक शतके करण्याचा उच्चाक इग्लिश खेळाडूनीहि अजून ओलाडला नाही

## (२२) ब्रॅडमनच्या 'शतकां'चें शतक!

जगविख्यात क्रिकेटपटू ब्रॅडमाने आपल्या असामान्य फलदाजीने अनेक वेळा मैदान गाजविले आहे व अनेक उच्चाकाची रास उभारून ठेवली आहे तथापि त्याच्या आयुष्यात दोन सामने विशेष सस्मरणीय ठरले आहेत १९४७ साली भारतीय सघ ऑस्ट्रेलियाच्या सफरीवर गला असताना आम्हांला आमच्या सघाविरुद्ध त्याचे 'शतकाचे शतक होण्याचा अपूर्व योग पाहता आला तो लवकरच निवृत्त होणार असल्याने आपले शभरावे शतक काढण्यास स्वत ब्रॅडमन व ते पाहण्यास प्रेक्षक अत्यत उत्सुक झाले होते त्याच्या ज्या वेळी ९९ धावा झाल्या, त्या वेळी भारतीय नेत्याने गमत म्हणून पूर्वी कधीहि गोलदाजी न केलेल्या 'किशनचद' याच्या हातात मुद्दाम चेंडू दिला ब्रॅडमनला तो गोलदाज अगदी नवीन असल्याने त्याच्या मनाची चलबिचल व गोधळ पाहण्यासारखा होता त्यान अर्थातच फार जपून खेळून अत्यत काळजीने शतक पुरे करून मकडावाहर पडल्याचा जो सुस्कारा सोडला, तो विनोदी प्रसग आठवणीत राहण्याजोगा होता

# जागतिक कीर्तीचे कांही खेळाडू व त्यांचीं वैशिष्टयें

## डब्ल्यू. जी. ग्रेस

गेल्या शतकात क्रिकेटच्या लौकिक व प्रसार वाढविण्यात डॉ. डब्ल्यू. जी. ग्रेस यांना अग्रस्थान द्यावे लागेल. भव्य शरीरयष्टि, अष्टपैलू खेळ व लांब दाढी यामुळे ते मैदानावर उठून दिसत. १८८० साली ऑस्ट्रो-इंग्लंड टेस्टमध्ये त्यांनी प्रथमदर्शनीच शतक फडकावले. टेस्टमध्ये तसेच इंग्लंड-मधील ग्लूस्टर परगण्याकडून खेळताना त्यांनी अनेक संस्मरणीय विक्रम करून ठेवले आहेत. त्यांचे नुसते आकडेसुद्धा आश्चर्य वाटण्याइतके दणदणीत वाटतील. १८६५ ते १९०८ या ४४ वर्षांच्या अवधीत, सतत, अव्वल दर्जाच्या खेळात चमकत राहून, त्यांनी ५४.८९६ धावा केल्या, १२६ वैयक्तिक शतके काढली व जास्त कौतुकाची गोष्ट म्हणजे २८७६ बळी स्वत गोलंदाजी करून घेतले. वयाच्या सोळाव्या वर्षी त्यांनी प्रथम मोठ्या सामन्यात हौशी खेळाडू म्हणून (जंटलमेन विरुद्ध प्रोफेशनल्स) प्रवेश केला व १९०६ साली आपल्या

शेवटच्या सामन्यात वयाच्या ५८ व्या वर्षी ७४ धावा केल्या त्यापुढेहि १९१४ साली, म्हणजे मृत्यूपूर्वी एक वर्ष, ६६ वय झाले असतांहि एका साध्या सामन्यात भाग घेऊन, 'ग्रेसनी' संघाच्या १५५ पैकी ६९ धावा स्वत काढल्या इतका दीर्घ काळ प्रकृति उत्तम राखून खेळात लक्ष घालणारा व निर्वाहाचे इतर व्यवसाय सभाळून, स्वत भाग घेणारा क्रिकेटपटु अजून झाला नाही अर्था तच 'क्रिकेटचा भीष्माचार्य' म्हणून इग्लडच्या एम सी सी ने १९४८ साली त्याच्या जन्माचा शतसावत्सरिक उत्सव केला व लन्नमधील लॉर्ड्सच्या मैदानाच्या प्रवशद्वारावर त्याच नाव कोरून स्मारक केले इतर अनेक ठिकाणीहि त्याच्या स्मरणार्थ अनेक तऱ्हेची स्मारके पूर्वीच झालेली होती

डब्ल्यू जी चे उच्चाक व पराक्रम जरी पुढे ऑस्ट्रेलियन डॉन ब्रॅडमनने मागे टाकले असले, तरी गेल्या शतकातील खराब, मैदाने, उत्तेजनाचा अभाव, प्रतिकूल परिस्थिति व खेळातील अव्यवस्था वगैरे अडचणीचा विचार केला असता, ग्रेस, ब्रॅडमनपेक्षा पराक्रमात कमी ठरणार नाहीत शिवाय त्यानी गोलदाजीचाहि भार प्रत्येक वळी वाहिल्याने, खेळात त्याचे एकदर गुण सर्वांपेक्षा जास्त भरतील अस वाटत ग्रेसच्या खेळात नाजूक कलेपेक्षा, दणदणीत टोलेबाजीवर विशेष भर असे ज्या बाजूला क्षेत्ररक्षक नसतील व जी उघडी पडली असल, तिकडे चेडू कसेहि करून टोलावण्यात ते तरबेज होते मल्ला सारखें कसलेल शरीर असल्याने, कित्येक लढतीत, एक क्षणाचाहि विसावा न घेता, खेळाच्या सर्व अगोपागात ते सारख्याच उत्साहाने भाग घेत असत मध्यम वेग परतु प्रतिपक्षाचे दोष शोधून त्यावर अचूक डावपेच-योजना, हे त्याच्या गोलदाजीचे विशेष असत

इग्लिश क्रिकेटच्या प्रगतीला त्यानी पुर अर्धशतक जो हातभार लावला त्यामुळे त्याना ग्रेट चॅपिअन वगैरे ज्या पदव्या लोकानी दिल्या त्या ग्रेसच्या अपूव कामगिरीवरून सार्थ वाटू लागतात

## प्रिन्स रणजितसिंह

गेल्या शतकात रणजीनी परकीय खेळाची कला पूर्ण आत्मसात् केली व तीत प्रत्यक्ष इग्लडमध्ये अग्रपद मिळविले, एवढेच नव्हे, तर आपल्या

करून व कौशल्यानं सर्वांस मोहित करून टाकणे त्याच्या खेळाचा विशेष म्हणजे लेट कट व लेग ग्लान्स हे दोन टोले ते इतक्या सहज व सफाईने मारीत असत की यष्टीवर वेगानं चाल करून येणारा चेंडू जादू केल्याप्रमाणे, एकदम सीमेपार जाताना दिसे अर्थातच तज्ञ प्रेक्षक खूप होऊन, त्यांना फलंदाजीचा जादूगार म्हणत असत सर्वांचेच मनगट व अत्यंत तीक्ष्ण नजर या नैसर्गिक देणग्यामुळेच रणजीना ते अवघड टोले साध्य झाले होते समोर उचावरून टोलेबाजी करणे अगर फटकार चढविणे, या सामान्य लोकाना आवडणाऱ्या खेळाच्या बाजूकडे त्यांची प्रवृत्ति नव्हती अर्थातच मंद चेंडूपेक्षा वेगाने येणारे चेंडू त्याना सोयीचे वाटत व अशा अंगावर येणाऱ्या चेंडूचा समाचार ते न भिता घेत असत

गुणाप्रमाणे धावांच्या सख्येतहि रणजीना श्रेष्ठ स्थान द्यावे लागेल स्वत इग्रज नसताहि इग्रज सघात्न आस्ट्रेलियनाविरुद्ध टेस्ट सामन्यात स्थान मिळविणे हा विक्रम रणजीनी प्रथम सपादन केला त्यामुळे पुढे दुलीप सिंह व पतौडीचे नवाब याना त्याचे अनुकरण करून तो मान मिळविण्याची संधि व उमेद मिळाली रणजीना ससक्स परगण्याकडून नेतृत्वाचाहि मान गेल्या शतकाच्या अखेरीस काही वर्षे सतत मिळाला १८९६ ते १९०० ही पाच वर्षे त्यांच्या परमोत्कर्षाची असून त्यानी दोन वर्षे सतत तीन

प्रयत्न केले नाहीत व म्हणून त्याचा अनुभव, ज्ञान, लौकिक व संपत्ति याचा भारतास अपेक्षित उपयोग झाला नाही. रणजी पुढे १९३३ साली निवर्तले व त्याच्या स्मरणार्थ, भारतीय क्रिकेट बोर्डाने रणजी करडक सामन्याची प्राणप्रतिष्ठा केली, व ते वार्षिक सामने १९३४ पासून आजतागायत व्यवस्थितपणे चालू आहेत

## ट्रंपर, जेसप व बुले

ट्रपर, जेसप व बुले हे तिघे चालू शतकाच्या आरंभी दणदणीत फलंदाजीबद्दल प्रसिद्ध होते ट्रपर या ऑस्ट्रेलियन फलंदाजाने पन्नास वर्षांपूर्वीच्या टेस्टमध्ये हिरवळी (पिचेस) हल्लीप्रमाणे व्यवस्थित ठेवल्या जात नसताहि इंग्लंडविरुद्ध सहा शतके केली होती तो मैदानावर उतरला असता इंग्रज गोलंदाज म्हणत की, 'क्षेत्ररक्षक कसेहि ठेवा, ट्रपर त्याचे वर्तुळ भेदून चेंडू सीमापार पाठवू शकतो,' इतकी त्याच्या टोल्यात तडफ असे

जेसप व बुले हे दोन इंग्रज एम् सी सी कडून अनेक सामन्यात आक्रमक व आवेशयुक्त फलंदाजीने चमकले. त्यांच्या 'ड्राइव्ह' टोल्यात इतका वेग असे की, क्षेत्ररक्षक चेंडू अडविण्यास कित्येक वेळा धजत नसत अत्यंत तडफदार व आकर्षक टोल्याबद्दल त्यांची अजूनहि जुने इंग्रज प्रेक्षक आठवण काढतात. बुले हा डावखोरा असून गोलंदाजीतहि तितकाच तरबेज होता. भारतातल्या सी के नायडू, खंडेराव रांगणेकर किंवा अमरसिंग यांच्या धर्तीवर वरील तिघांचा खेळ धडाडीने होत असे व धावाची गति कमालीची शीघ्र होई व खेळात रंग भरे हे तिघे टोलेबाज म्हणून अतिशय विख्यात होते

## हॉब्स

डब्ल्यू जी ग्रेसनंतर इंग्लिश क्रिकेट जर कोणाचे ऋणी असेल तर ते अनेक वर्षे ( १९११ ते १९२८ पर्यंत ) टेस्ट सामन्यात इंग्लंडची आघाडी उत्कृष्ट फलंदाजीने सभाळणाऱ्या जॅक हॉब्सचे आहे तो आघाडीवर नेहमी न भिता उभा राहत असल्याने, प्रतिपक्षीय गोलंदाजाची नांगी मोडून काढण्याकडे त्याचे प्रथम लक्ष असे व नंतर योग्य संधि साधून तो हल्ला चढवीत असे त्याच्या खेळात अर्थातच तडफ, टोलेबाजी कमी, पण सावधपणा, डावपेच

प्राप्त करून दिला होता. सकटाच्या वेळी, त्याच्या खेळाला विशेप उठाव दिसून येई. "मला लढत आवडते" असे तो म्हणत. असे तो व हॉब्स याची जोडी इतकी तरबेज असे, की अशक्य वाटणाऱ्या धावा, ते सहज धोक्याशिवाय पळून घेत. ऑस्ट्रेलियाविरुद्ध अकरा वेळा या जोडीने शभराच्या वर धावाची भागीदारी केली आहे. लेगकडे टोलेबाजी, विशेषत: 'हुक' टोल्यात तो निष्णात असून, ग्रिमेटसारख्या अचूक गोलदाजाचे चेंडूहि त्याने लॉग-लेगकडे खेचले होते. ऑस्ट्रेलियाविरुद्ध त्याने स्वत:ची ८ शतके रचली होती.

सर्व इग्रज खेळाडूत जास्त धावा व सरासरी प्रस्थापित करण्याचाहि उच्चांक त्याने केला आहे. शिवाय काउंटी सामन्यात यॉर्क परगण्याकडून पहिल्या जोडीची सर्वांत जास्त भागीदारी (५५५ धावाची) त्याने होम्सबरोबर खेळून निर्माण केली आहे; व अजूनहि ती कोणी मोडलेली नाही. हॉब्सबरोबर सटक्लिफसुद्धा १९३० साली भारतात खेळून गेला. १९१९ पासून १९३३ पर्यंत, तो अव्वल दर्जाच्या क्रिकेटमध्ये भाग घेत होता व नतर खेळातून निवृत्त झाला. क्रिकेटच्या इतिहासात हॉब्स-सटक्लिफ ही इग्रज जोडी, ऑस्ट्रेलियन पॉन्सफोर्ड-वुडफुलप्रमाणे अविस्मरणीय ठरली आहे.

## मॅकार्टने

ऑस्ट्रेलियन फलदाजीत जी तडफ दिसून येते, तिचा परमोत्कर्ष मॅकार्टनेच्या खेळात दिसून येई. टेस्ट सामन्यात उपाहारापूर्वी म्हणजे दोन तासाच्या आत शतक काढण्याचा विक्रम मॅकार्टने याने प्रथम केला. एकदा जुना वीर व्हिक्टर ट्रपरची त्याच्यासमोर कोणी स्तुति केली त्याला मॅकार्टने याने लगेच आत्मविश्वासाने उत्तर दिले की– "त्याने अशी कोणती अचाट कामगिरी केली की मी ती करू शकणार नाही?" 'मॅकार्टने'ने इग्लडविरुद्ध एकंदर पाच शतके केली; १९२६ मध्ये तर लागोपाठ तीन टेस्टमध्ये त्याने तीन शतके रचून हॉब्सनतर दुसऱ्या वेळी विक्रम केला. जवळजवळ वीस वर्षे टेस्ट क्रिकेटमध्ये तो चमकत राहिला. शरिराने उच व धिप्पाड नसतानाहि, पोलादी मनगटामुळे तो प्रतिपक्षाची कसलीहि गोलदाजी फोडून काढी.

## फ्रँक टॅरंट

फरँक टॅरंट हा मूळचा ऑस्ट्रेलियन, पण स्वदेशात खेळाचा धंदा नसल्याने, १९०७ च्या सुमारास इंग्लंडात जाऊन, मिडलसेक्स परगण्यातून खेळू लागला. तो अष्टपैलू खेळाडू असल्याने त्याचा अँग्लो-ऑस्ट्रेलियन टेस्टमध्ये अंतर्भाव होणे अपेक्षित होते पण तो परका व धंदवाईक खेळाडू असल्याने, त्या वेळच्या प्रथेप्रमाणे, टेस्टमध्ये निवड होण्याचा मान त्याला मिळाला नाही. त्याचा विशेष म्हणजे, तो डाव्या हाताने गोलंदाजी व उजव्या हाताने फलंदाजी करी व दोहोंतहि प्रभावी ठरे. पहिल्या महायुद्धाच्या काळात, तो भारतात काही वर्षे चौरंगी वगैरे मोठ्या सामन्यात खेळला व त्याच्या मदतीने, येथील इंग्रज, चौरंगी सामन्यात अनेक वेळा श्रेष्ठ ठरले. गोलंदाजीत त्याचा नेमदार लेगब्रेक घातक ठरे. त्याने १९१५ साली, चौरंगी सामन्यात दोन्ही डावात मुस्लिमांचा २१ व ३९ धावात धुव्वा उडवला होता. १९१६ साली त्याने हिंदु संघाचे ११ बळी दोन्ही डावात घेतले व स्वत च्या ६८ नाबाद व ८० बाद अशा दणदणीत धावा करून जय मिळविला होता. फलंदाजीची त्याची पद्धत विशेष आकर्षक नव्हती. बॅट बरीच खाली धरून, वाकून उभे

भय वाटे की, जेव्हा १९३२ साली, तो टेस्टमध्ये एकाएकी लवकर बाद झाला, त्या वेळी हजारो ऑस्ट्रेलियन प्रेक्षक विजय मिळणार म्हणून आनंदाने नाचत राहिले इतकी त्याची खेळात घडाडी होती शतके व द्विशतके काढण्यातील त्याचे उच्चांक पुढे ब्रॅडमनने मोडून टाकले, आणि जरी धावाच्या एकूण सख्येंत तो मागे पडला तरी खेळाची सफाई, कलात्मकता व आकर्षकता या गुणात तो निःसशय ब्रॅडमनपेक्षा श्रेष्ठ होता त्याने पहिल्या दर्जाच्या



वॉल्टर हॅमड.

खेळात ४७,००० धावा करून, प्रत्येक डावाची ५५ अशी कौतुकास्पद सरासरी प्रस्थापित केली टेस्ट सामन्यात तो १९२८ पासून १९४६ पर्यंत चमकत होता पण दुसऱ्या युद्धात, क्रिकेटमध्ये जो खड पडला त्यामुळे त्याचे कौशल्य मावळून त्याला निवृत्त व्हावे लागले

## ऱ्होड्स व हर्स्ट

टॅरटप्रमाणे 'ऱ्होड्स' व 'हर्स्ट' ही इग्रज गोलदाजाची जोडी एकसाल इग्रजाची आधार ठरली होती हे दोघेहि वीर १९२१ साली मुबईच्या चौरगी सामन्यात खेळले, व त्यानी हिंदूविरुद्ध व पारशांविरुद्ध युरोपिअन सघाला एक सबध डाव व कित्येक धावानी प्रचड विजय मिळवून दिला ऱ्होड्सचा विशेष म्हणजे तो खेळाच्या सर्व शाखात प्रवीण होता त्याने हिंदूविरुद्ध

१५६ धावा व ७ वुइकेटस् घेतल्या नंतरच्या सामन्यात पारशांविरुद्ध १८३ धावा व १२ वुइकेट्स् घेऊन, स्वतःच खेळावरील प्रभुत्व त्याने सिद्ध केले. ऑस्ट्रेलियाविरुद्धहि त्याने टेस्टमध्ये 'डबल' म्हणजे एक हजारावर धावा व शंभरावर वुइकेटस घेण्याचा मान मिळवला.

त्याच्या गोलंदाजीत 'लेग ब्रेक'वर जास्त भर असे व चेंडू लावता व फसवा टाकून, फलंदाजाला पुढे खेचण्यात त्याचे कौशल्य दिसून येई. फलंदाजीत तडफ कमी, पण चेंडू रक्षक नसेल तिकडे टोलावून म्हणजे प्लेसिंगने धावा घेण्याची प्रवृत्ति जास्त दिसून येई. अंगात नैसर्गिक गुण विशेष नसताना, निश्चयाने मेहनत करून, तो स्वयंनिर्मित खेळाडू बनला होता.

हर्स्ट डावखोरा गोलंदाज असून, इन स्विंगमध्ये अत्यंत कुशल होता. १९२१ साली मुंबईत चौरंगी सामन्यात आमचे फलंदाज त्याच्या स्विंग गोलंदाजीने गोंधळून गेले होते. फलंदाजीत तो बेताचा असला, तरी टेस्ट सामन्यात प्रवेश मिळण्याइतके नैपुण्य त्याने संपादन केले होते. चालू शतकाच्या प्रारंभी, ह्या जोडीने इंग्रजांना टेस्टमध्ये अनेक विजय मिळवून दिले.

## डॉन ब्रॅडमन

१९३४ पासून १९५२ पर्यंत ऑस्ट्रेलियाने इंग्लंडवर जे अनेक विजय मिळविले व 'रबर' हस्तगत केले, त्याचे मुख्य श्रेय, त्याचा सर्वश्रेष्ठ फलंदाज व कुशल सेनानी डॉन ब्रॅडमनला दिले पाहिजे. तो ज्या ज्या वेळी व्यक्तिशः यशस्वी होई व धावांचे डोंगर रची, त्या त्या सामन्यात आस्ट्रेलिया हटकून जय मिळवी. उलट तो अपेशी झाला तर मात्र संघ पराभूत होई. इतका त्याचा संघ त्याच्या खेळावर अवलंबून असे. त्याची अत्यंत तीक्ष्ण नजर, स्थिर मन, निश्चयी बुद्धि व महत्त्वाकांक्षी स्वभाव या गुणसमुच्चयामुळे त्याने कोणी पूर्वी मिळविले नव्हते इतके यश क्रीडांगणावर मिळविले. त्याचा खेळ यंत्रासारखा अचूक असून, टांकसाळीतून नाणी बाहेर पडावीत तशा धावा निघत असत. उच्चांक निर्माण करण्याची मोठी महत्त्वाकांक्षा असल्याने, दोनतीन शतके निघाली, तरी स्वैरपणे अगर बेसावधपणे तो क्वचीत खेळत नसे. त्यामुळे त्याच्या खेळात, कलेचा आकर्षकपणा कमी असे. त्यात आणखी उणीव म्हणजे तो वाकून पवित्रा घेई व बॅट वाकडी करून

लेगकडे बरेचसे चेंडू मारी अर्थानच 'लेट कट' व 'लेग ग्लान्स'सारखे लोकाना आवडणारे टोले त्याच्या खेळात कमी असत त्याची उंची बरीच कमी असल्याने, घडाडीचा टोलेबाजी, फटकार वगैरे त्याला शक्य नव्हते, पण त्याची उणीव तो चिकाटीने भरून काढीत असे. तो 'कव्हर पॉइंट'चे क्षेत्ररक्षण तरुणपणी उत्कृष्ट करी शिवाय युद्धोत्तर कालात त्याच्याकडे नेतृत्व आल्यावर शिकदरप्रमाणे आपण एकहि पराभव न सोसता, दिग्विजय करू, अशी ईर्ष्या उत्पन्न झाली व त्याने ती १९४८ मध्ये उत्कृष्ट संघ इग्लडच्या स्वारीवर नेऊन पुरी केली १९३० पासून १९४८ पर्यंत अव्याहत तो क्रिकेटक्षेत्रात तळपत होता व निस्तेज होऊन, अस्ताला जाण्यापूर्वीच १९४८ मध्ये आपण होऊन निवृत्त झाला पराक्रमाच्या व कीर्तीच्या शिखरावर असताना आपला आवडता खेळ सोडण्यात, त्याचा मनावर जो ताबा दिसला, तो कौतुकास्पद होता

ब्रॅडमनच्या विरुद्ध साधी नेहमीची गोलंदाजी व डावपेच यशस्वी होत नाहीत, अशी खात्री झाल्याने, इग्रज नेता जार्डीन याने १९३२ साली, लारवुड, व्होज या आपल्या तुफानी गोलंदाजाना ब्रॅडमनला घाबरवून सोडण्यास, नवीन तऱ्हेची शरीरवेधी (बॉडीलाइन) गोलंदाजी व तिला अनुकूल व्यूह तयार करण्यास सागितले. अशा डावपेचात खेळापेक्षा मारामारी व प्रतिपक्षाला निकामी करण्याची बुद्धि दिसू लागल्याने, इग्लडनेच आपणहून गोलंदाजीचा हा प्रकार नियमबाह्य ठरविला ब्रॅडमनच्या धावाचे यत्र मोडून टाकण्यास असे अघोरी उपाय योजावे लागले यावरून, प्रतिपक्षी त्याच्यापुढे हताश होत असे सिद्ध होते

सीझरप्रमाणे ब्रॅडमन आपल्या क्षेत्रात अत्यंत महत्त्वाकांक्षी असल्याने त्याच्याविषयी सर्वाना आदर वाटला, तरी आपुलकी वाटली नाही, व तो अपेक्षेप्रमाणे बरीच वर्षे लोकप्रिय झाला नाही त्याच्या वर्तनातला दोष म्हणजे क्रीडागणावरहि तो व्यवहारी, हिशेबी व गभीर दिसे व त्या मानाने खेळीमेळीचे वातावरण कमी होई त्याने क्रिकेटमध्ये जो सर्वाना दिपवून टाकणारा पराक्रम केला, अनेक उच्चाक प्रस्थापित केले व खेळ लोकप्रिय केला, त्याबद्दल त्याला इग्लडने 'नाइटहुड' म्हणजे 'सर' ही पदवी

दिली प्रत्यक्ष खेळात भाग घणाऱ्याला म्हणजे तरुणाला ( ४० व्या वर्षी ) हा मान प्रथमच दिल्याचे दिसेल त्याचे उच्चांक ( पहिल्या दर्जाच्या सामन्यात ) खालीलप्रमाणे--

(१) ४५२ वैयक्तिक सर्वात जास्त धावा
(२) ३०० वर धावा एकाच डावात, सहा वेळा
(३) २०० वर धावा एकाच डावात, ३७ वेळा
(४) एकाच सामन्यात दोन डावात दोन वेगळी शतके चार वेळा केली हा विक्रम फक्त फराय, हॅमंड व हॉब्स यांनी मागे सारला.
(५) लागोपाठ सामन्यात शतके सहा वेळा
(६) इंग्लंडमध्ये म महिनाअखेर ( म्हणजे १ महिन्याच्या खेळात ) एक हजार धावा दोन वेळा काढल्या
(७) टेस्ट सामन्यात सर्वात जास्त शतके-- २८ (१८ इंग्लंडविरुद्ध, ४ भारताविरुद्ध, ४ दक्षिण आफ्रिकेविरुद्ध व २ वेस्ट इंडीजविरुद्ध )
(८) ऑस्ट्रेलिया विरुद्ध इंग्लंड या टेस्टमध्ये ८ द्विशतके
(९) एका वर्षाच्या टेस्टमध्ये (१९३० मध्ये) इंग्लंडविरुद्ध ९७४ धावा.
(१०) दुसऱ्या वुकिटची भागीदारी ४५१, पाचव्याची ४०५ (दोन्ही इंग्लंडविरुद्ध टेस्टमध्ये ).

## दुलीपसिंह

राजघराण्यात जन्म व रणजीच उत्तेजन या सधीमुळे, दुलीपचा विलायतेतील वरिष्ठ क्रिकेटमध्ये वयाच्या विसाव्या वर्षी म्हणजे १९२५ साली प्रवेश झाला त्या वर्षी त्याने केंब्रिज विद्यालयाचा 'क्रिकेट ब्ल्यू' मिळविण्याचा मान संपादन केला व तयून काउंटी व टेस्ट सामन्यात त्याला फलंदाजीतल्या गुणावर लगच प्रवेश मिळाला १९२५ ते १९३३ या आठ वर्षात त्याच्या खेळातली चमक, कसोटी सामन्यातहि दिसून आली आपल्या चुलत्याप्रमाणे ( रणजी ) तोहि ससेक्सकडून खेळे व शेवटी त्या काउंटीचे



दुलीपसिंह

नेतृत्वहि त्याच्याकडे सोपविण्यात आलं १९२८ साली, त्याचा पराक्रम कळसास पोचून त्याने ससक्सतर्फे ११ सामन्यात १०८२ धावा (त्यात सहा शतकें) केल्या व एकंदर काउंटी सामन्यात दर डावाला साठ धावांची सरासरी पाडून ससेक्सच फलदाजीतले अग्रपद मिळविले १९२९ सालीहि त्याने तोच लौकिक कायम ठेवला केंटविरुद्ध त्याने एका डावात ११५ तर लगेच दुसऱ्यात २४६ करून एकाच सामन्यात एक शतक व द्विशतक करून कौतुकास्पद विक्रम केला साहजिकच ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंडविरुद्ध टेस्टमध्ये तो परदेशस्थ असताहि त्याला इंग्लिश संघात घ्यावे लागले, व १९३० मध्ये लॉर्डसच्या मैदानावर, ऑस्ट्रेलियाविरुद्ध टेस्टमध्ये प्रथमदर्शनीच रणजीप्रमाणे त्यानेहि शतक (१७३ धावा) फडकावले त्या साली सर्व काउंटीमध्ये त्याने ५७ धावांची सरासरी पाडून इंग्लंडमध्ये सटक्लिफच्या खालोखाल म्हणजे फलदाजात दुसरा क्रमांक पटकावला त्याची कर्तबगारी अशी वाढत असता, १९३३ साली त्याची प्रकृति एकाएकी इतकी ढासळली की त्याला खेळ कायमचे वर्ज्य करावे लागले व सर्वांची निराशा झाली पहिल्या दर्जाच्या खेळात त्याने पन्नास शतके रचली होती व त्यात सर्वश्रेष्ठ आकडा ३३३ सन १९३० साली नॉर्दम्पटनविरुद्ध होता

त्याच्या फलदाजीत जितकी तडफ तितकीच सफाई व आकर्षकता दिसून येई तीक्ष्ण नजर, चपळ पदद्वय व लवचीक मनगट या नैसर्गिक

देणगीमुळे, त्याच्या खेळात व हालचालीत कलेचे सौंदर्य आढळून येई. चायावर बॅट टाकून, चेडू सोडीत राहणे व बचावासाठी वेळ काढणे, या धदेवाईक खेळाडूच्या पद्धति त्याने कधीच अनुसरल्या नाहीत, उलट खेळात धाडस, गति व आक्रमकता आणली गुगली गोलदाजी पुढे जाऊन चोपण्यात व चेडू असुरक्षित जागी टोलावण्यात त्याचा हातखडा असे व हे त्याचे कौशल्य १९२८ साली, तो चौरगी सामन्यात हिंदु संघाकडून पारशी गोलदाजीचा समाचार घेऊन भराभर धावा गोळा करताना भारतीय प्रेक्षकाना उत्तम दिसून आले. त्याच्यासबधी इग्रज गोलदाज म्हणत की, दुलीपला बाद कसा करावा या प्रश्नापेक्षा त्याच्या धावाचा वेग कसा थाबवावा हा आमच्यापुढे प्रथम प्रश्न उभा राहतो! असा वीर, पराक्रमाचे अत्युच्च शिखर गाठण्याच्या अगोदरच आजाराने सपूर्ण निवृत्त व्हावा हे क्रिकेटचे दुर्दैव! दुलीपसिहास भारताने नुकतेच ऑस्ट्रेलियात हाय कमिशनर म्हणून नेमले होते पण, भारतीय क्रिकेट मडळाला अशा निष्णात क्रिकेटपटूचा उपयोग करून घेण्याची बुद्धि होऊ नये हे दुसरे दुर्दैव समजले पाहिजे

## हटन

यॉर्कशायर परगण्याकडून मोठ्या सामन्यात तो प्रथम प्रविष्ट झाला व जरी १९३७ साली न्यूझीलडविरुद्ध पहिल्याच टेस्टमध्ये त्याला अपयश आले, तरी खचून न जाता, त्याने लगेच दुसऱ्यात शतक काढले, १९३८ साली ऑस्ट्रेलियाविरुद्ध मात्र, प्रथमदर्शनीच शतक रचण्याचा मोठा लौकिक त्याने मिळवला व त्याच साली, ओव्हल मैदानावर झालेल्या शेवटच्या पाचव्या टेस्टमध्ये ब्रॅडमनच्या सघाविरुद्ध वैयक्तिक ३६४ धावाचा व साधिक ९०३ धावाचा उच्चाक टेस्ट-लढतीत प्रस्थापित करून, इग्लडला १ डाव व ५७९ धावानी प्रचड विजय त्याने मिळवून दिला आघाडीचा फलदाज म्हणून

खेळाडू असताहि, इग्रज सघाचे नेतृत्व त्याच्याकडे सोपविले जाईल, असे, १९५५ मध्ये त्याने ऑस्ट्रेलियाविरुद्ध तीन टेस्ट जिंकल्याने स्पष्ट झाल त्याच्या खेळात धाडसापेक्षा व कलेपेक्षा, शास्त्रावर व यशावर जास्त दृष्टि असते त्यामुळे 'मुहूर्त ज्वलित श्रेय न च धूमायित चिर' ह साहस त्याला नाहीहि करून जय मिळविण्याच्या दृष्टीने पसत नसावे तरी, सर्व तऱ्हेचे टोल तो मारु शकतो व 'ऑफ ड्राइव्ह मध्ये तो विशेष तरवेज आहे अजून काही वर्षे तो टेस्ट खेळणार असल्याने, तो कोणते उच्चाक निर्माण करतो व नेता म्हणून इग्लडला पूर्वीच श्रेष्ठपद कसे मिळवून देतो हे पाहिले पाहिजे

## लीअरी कॉन्स्टंटाइन (वेस्ट इडिअन)

अत्यत चपळ, तडफदार, उत्साही आणि अष्टपैलू (ऑलराउड) खेळाडू म्हणून स्वदेशात व इग्लडमध्ये त्याचा, दोन्ही महायुद्धामधल्या काळात मोठा लौकिक होता निग्रो जमातीचे अनेक मल्ल जेसी ओवेन वगैरे जसे जागतिक ऑलिंपिकमध्ये धावण्याच्या शर्यतीत चमकले, तसाच पराक्रम लीअरीने क्रिकेट क्षेत्रात दाखविला तो मैदानावर क्षेत्ररक्षक अगर गोलदाज म्हणून असताना मूर्तिमत उत्साह व आवश मैदानावर उतरलेला दिस त्याची एक आठवण सागतात तो गोलदाजी करीत असताना लेगकडे टोलावलेला एक चेंडू त्याने धावत जाऊन अडवला व स्टपवर फेकला तो अचूक लागला, पण फलदाज रेषेच्या आत आल्याने, उपयोग झाला नाही याच वळी चडू बाजूस गेला आह अस पाहून फलदाज पुन्हा धावेचा प्रयत्न करू लागला पण लीअरीने चित्यासारखी पुन्हा चडूवर उडी मारून पळणाऱ्या फलदाजाला धावबाद केल गोलदाजीतहि लाटवृडप्रमाणे तो वेग ओतून प्रतिपक्षीयाना घाबरवून सोडी फलदाजीत अवास्तव सावधपणा व मदपणा त्याने कधीच पत्करला नाही म्हणून त्याच्या तडफदार टोलबाजीवर प्रेक्षक खूप असत त्याने एका मोसमात एक हजार धावा व शभर बळी घेऊन, नाव मिळविल चाळिशीनतर वरिष्ठ खेळातून निवृत्त झाल्यावर, तो काही वर्षे इग्लडमधील लँकेशाअर लीग दगलीत धदेवाईक म्हणून खेळ अस व त्याच्या आकर्षक खेळामुळे लीग क्रिकेटच महत्त्व

वाढे तो १९३६ मध्ये भारतात येऊन काही सामने खेळला त्या वेळी त्याची व भारताचा त्याला तुल्यबल प्रतिस्पर्धी अमरसिंग याची लढत प्रेक्षणीय व चुरशीची ठरली होती खेळाच्या सर्व शाखांचा विचार केला तर तो अमरसिंगापेक्षा निःसशय श्रेष्ठ होता क्रिकेटवर त्याने काही पुस्तक व लेखहि लिहिले आहेत व क्रिकेट शिक्षकाचे कामहि उत्तम रीतीने करत आहे

## ग्रिमेट (ऑस्ट्रेलियन गोलंदाज)

वयाच्या तीस वर्षानंतर, स्वतः मेहनत घेऊन व निरनिराळे प्रयोग करून गोलंदाजीत चमकणाऱ्यामध्ये, त्याला पहिले स्थान द्यावे लागेल त्याने चेंडूला निरनिराळ्या तऱ्हेच्या फिरती कशा द्याव्या याचा अभ्यास टेनिस चेंडूने घरीच केल्याचे सांगतात १९२५ साली इंग्लंडविरुद्ध सिडने येथे प्रथमच टेस्ट खेळताना त्याने दोन्ही डावात मिळून अकरा बळी फक्त ८२ धावात घेतले व आपल्या संघाला १ डाव व ३०७ धावांचा मोठा विजय मिळवून दिला सुप्रसिद्ध इंग्रज फलंदाज हॉब्स त्याच्या करामतीने इतका गोंधळून गेला की त्याने ग्रिमेट हा 'परीक ऑफ नेचर' म्हणजे 'निसर्गाचे कोडे' आहे असे उद्गार काढले त्याने आपल्या दहा वर्षांच्या कारकीर्दीत इंग्रजांचे ८९ फलंदाज टेस्टमध्ये बाद केले चेंडू टाकताना तो बराच वाकतो व उजवा खांदा खाली वळवून राउंड आर्म पद्धतीने गोलंदाजी करतो अर्थातच अशा हालचालीत आकर्षकपणा कमी असतो पण गुगलीची फिरत आणण्यास, त्याला हा दोष पत्करावा लागतो शरिराने दुबळा व उंचीने खुजा असलेला ग्रिमेट, मोठमोठ्या इंग्रज वीरांना चकवून नामोहरम करू शकला हे विशेष आश्चर्य समजले पाहिजे उशिरा क्रिकेटमध्ये प्रवेश व वाव मिळाल्याने, त्याला चाळिशीच्या सुमारास टेस्टमधून निवृत्त व्हावे लागले ग्रिमेट पंधरा वर्षांपूर्वी जतच्या राजेसाहेबांच्या निमंत्रणावरून भारतात काही महिने राहून, स्थानिक सामने खेळला पण त्याच्या कौशल्याचे व कलेचे जवळून निरीक्षण करून अगर त्याकडून शिक्षण घेऊन, नवीन गोलंदाज तयार करण्याच्या कामी त्याच्या येथील वास्तव्याचा फायदा कोणी करून घेतला नाही

## वॉरेल, वीक्स आणि वॉलकॉट ( वेस्ट इंडियन )



वॉरेल.

युद्धोत्तर काळात वेस्ट इंडीज संघाने इंग्लंडवर टेस्टमध्ये जे अनेक विजय मिळविले व दरारा उत्पन्न केला, त्या कामगिरीत वरील तीन वीरांचा मुख्य भाग होता प्रत्येक सामन्यात तिघांपैकी एक किंवा दोघे हटकून शतक रचीत व स्वपक्ष बळकट करून ठेवीत. म्हणून त्यांना संघाचे 'आधारस्तंभ', 'तीन शिलेदार' किंवा नावामुळे 'तीन डब्ल्यूज'

रक्षणातहि तो चपळ असून कव्हरकडे उत्तम रक्षण करतो आता तो अवघा एकोणतीस वर्षांचा असल्याने त्याचे कौशल्य विकास पावण्याला वाव आहे

वॉरेलमध्ये वीक्सची धडाडी व जोम नसला तरी सफाई व आकर्षकता जास्त असते धावांच्या संख्येत जरी तो वीक्सपेक्षा मागे पडत असला तरी त्याच्या कलायुक्त खेळावर प्रेक्षक प्रसन्न असतात गोलंदाजीत तो मध्यम वेगाने परंतु अचूक नेमाने चेंडू टाकू शकतो पण प्रमुख गोलंदाज म्हणून त्याला स्थान नाही व त्या बाबतीत त्याचे मोठे विक्रमहि नमूद नाहीत

वालकॉट सहा फुटावर उंच व जाडजूड असल्याने, तिघात जास्त टोलेबाजी व फटकार खेळात आणू शकतो प्रथम तो नसता यष्टिरक्षक होता पण हळूहळू गेली चार वर्षे फलंदाजीतहि तो चमकू लागला व १९५३–५४ मध्ये इंग्रज संघ वेस्ट इंडीज स्वारीवर गेला असताना, त्यांच्याविरुद्ध वॉलकॉटने सर्वांत जास्त धावा व शतकें काढली व इंग्रजांना रबर (विजयाधिक्य) जिंकू दिले नाही त्याने व वॉरेलने १९४६ साली बार्बाडोस विरुद्ध त्रिनिदाद यथील सामन्यात चौथ्या विकेटच्या भागीदारीत ५७४ धावा करून मोठा उच्चांक केला होता पण तो लगेच हझारे व गुलमहमद या जोडीने १९४७ साली आपल्या रणजी सामन्यात ५७७ धावा करून मोडून टाकला या प्रदीर्घ सामन्यात वालकॉटच्या ३१४ धावा होत्या त्याचे पुल आणि



वालकॉट

ड्राइव्ह टोले फार दणदणीत असतात. 'बॅकफूट'वर म्हणजे पुढे उडी अगर बॅटीची परज न करतां, टेनिसचा चेंडू मारावा तसा तो सहज पट्कार मारूं शकतो; हें १९४८ सालीं भारतीयांनी मुंबईच्या सामन्यांत समक्ष पाहिलें.

हे तिघे मागासलेल्या निग्रो जमातीचे असल्यानें, त्यांचें जास्त कौतुक होणें इष्ट आहे. पण तसें तें होत नसावें असें वाटतें.

## लारवूड (इंग्रज)

लारवूड या गोलंदाजाला, विशेष प्रसिद्धि १९३२ च्या बॉडीलाइन वादामुळे लाभली. त्याच्याइतका वेग पूर्वी किंवा नंतर कोणी कमावला नाही, असें नाही; तरी पण त्याचा जास्त बोलबाला होण्याचें कारण, त्यानें मारा करण्याचें शास्त्र बनवलें. इतकें की, १९३२ मध्यें ब्रॅडमन प्रभृति रथीमहारथींना त्याच्या व्यूहातून व हल्ल्यांतून सुटका करून घेतां आली नाही व जार्डीनच्या इंग्रज संघानें लारवूडच्या तुफानी माऱ्यामुळे ऑस्ट्रेलियनांचा धुव्वा उडवला. कित्येकांना जखमा झाल्या. अर्थातच त्यांनी अशा धोक्याच्या गोलंदाजीविरुद्ध एम्. सी. सी. कडे जोराची तक्रार केली व आपण यापुढे टेस्ट सामने बंद करूं, अशी धमकी दिली. तीमुळे व प्रत्यक्ष इंग्लंडमध्येंहि काहींनी अशी धोक्याची गोलंदाजी बंद करावी अशी मागणी केल्यानें



लारवूड.

लारवूड व त्याचा नेता जार्डीन या जोडीला खेळातून निवृत्त व्हावे लागले आपली गोलंदाजी नियमबाह्य नसताना व आपण इंग्लंडला रबर मिळवून दिले असताना, काही इंग्रजानीच कृतघ्नपणे आपल्याला दोष द्यावा हे लारवूडला फार लागले व त्याने खेळण्याचेच केवळ नव्हे तर १९३३ नंतर सामने पाहण्याचेहि बंद केले! सध्या तो ऑस्ट्रेलियात जाऊन अज्ञात असा राहत आहे त्याचा विशेष म्हणजे उंची फार नसतानाहि तो आपल्या ताकदीने व धावण्याच्या वेगाने, चेंडू इतक्या जोराने व अचूक आपटी की तो नेमका फलंदाजाच्या डोक्याच्या रोखाने यावा तो घावरून बळी पडावा शिवाय जवळ तिघांचे व बाहेर अंतरावर तिघांचे असे क्षेत्ररक्षकांचे कडें रचले जात असल्याने, चेंडूचा समाचार बॅटीने घेण अशक्य होई १९३२ साली लारवूडच्या मदतीने इंग्लंडने, ऑस्ट्रेलियनांवर प्रत्यक्ष त्यांच्याच मैदानावर चार विरुद्ध एक असे दणदणीत विजय मिळविले त्या श्रेणीत लारवूडचे ३३ बळी होते व ब्रॅडमनच्या एकूण अवघ्या ३९६ धावा व एक वेळचा मोठा आकडा फक्त १०३ होता ब्रॅडमनची इतकी दुर्दशा, पूर्वी व नंतर कोणी उडवली नाही लारवूड १९३६ साली निवृत्तीनंतर भारतात येऊन, मुंबईच्या चौरंगी सामन्यात युरोपिअनांकडून खेळत होता पण तो मनाने व शरिराने इतका खचला होता की त्याला साध्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध आठ षटकात अवघा एकच बळी मिळू शकला त्याचा वेग कमी झाला होता हे स्पष्ट होते इंग्लंडमध्ये तो नॉटिंगहॅमकडून काउंटी सामन्यात भाग घेई

## सी. के. नायडू

ककया नायडूंचे वडील स्वत चांगले खेळाडू असल्याने, लहानपणापासून त्यांना खेळांचे शिक्षण घरींच मिळाले त्याचा उपयोग करून प्रथम त्यांनी हॉकी, फूटबॉल व ॲथलेटिक्समध्ये उत्तम प्रगति केली व या खेळाच्या पायावर आपल्या क्रिकेटची १९१३ मध्ये उभारणी केली १९१६ मध्ये म्हणजे वयाच्या वीस एकविसाव्या वर्षी यांचा मुंबईच्या चौरंगी सामन्यात प्रथम प्रवेश झाला व १९२० साली त्यांनी आपले पहिले शतक फडकावले १९२६ मध्ये भारतात प्रथमच आलेल्या एम् सी सी. संघाविरुद्ध हिंदु संघातर्फे त्यांनी

जी अपूर्व टोलेबाजी व तडफ दाखवून अकरा षट्कार एका डावात मारले, त्या पराक्रमामुळ नायडू जास्त प्रसिद्ध झाले रणजी सामन्यात जरी त्याना विशेष कामगिरी करता आली नाही, तरी उतारवयात म्हणजे पन्नाशी नतरहि त्यानी एक द्विशतक काढल ते गोलदाजी करीत, पण तिला आक्रमक स्वरूप नसे भारतीय सघाचे नेतृत्व त्याच्याकडे अनेक वेळा येथे व विलायतेत सोपविले होते पण सघात एकी निर्माण करून व सघशक्ति वाढवून, अपेक्षित यश आतरराष्ट्रीय लढतीत त्याना मिळविता आले नाही तरीपण होळकर सघात चागल्या तयार खेळाडूची भरती करुन बाजू बळकट करण्याची कामगिरी, महाराजाच्या मदतीने त्यानी पार पाडली व होळकराना रणजी करडक चार वेळा मिळवून दिला अखिल भारतीय क्रिकेट नियामक मडळात व निवड व इतर समितीत नायडूना अनेक वेळा स्थान मिळाले, पण त्याना खेळाडूची सघटना व सहकाऱ्याचा विश्वास सपादन करता न आल्याने व मडळातील स्वार्थी गटबाजीला पायबद घालण्याइतका नि स्पृहपणा त्यानी न दाखविल्याने, भारतीय खेळाचा दर्जा उचावण्यात त्याना सधि असताहि, विशेष काम करून दाखविता आल नाही

उच व आकर्षक शरीरयष्टि, महत्त्वाकाक्षी मन व व्यवहारी बुद्धि या त्रयीवर नायडूनी भारतीय खेळात उच्च स्थान सपादन केले यात शका नाही फलदाजीत परिस्थितीप्रमाणे कधी दणकेबाज टोलेबाजी तर कधी जमिनीसरपट व शास्त्रोक्त खेळ याचा अवलब ते करू शकत म्हणूनच त्याना मोठ्या सामन्यात यश मिळत गेले तरुणपणी क्षेत्ररक्षणात व गोलदाजीतहि त्याचा उपयोग होई

## अमरसिंग

निधन व निरक्षर कुटुबात जन्म झाला असल्यामुळ विपरीत परिस्थितीशी झगडून अमरसिगास नैसर्गिक गुणामुळ खेळात अग्रस्थान मिळवाव लागले १९३० मध्ये हैद्राबादमधील एका सामन्यात विसाव्या वर्षी एक हात करू उमेदवार म्हणून अर्ध्या विजारीत व काळ्या बुटात खेळताना प्रथम तो तज्ञाच्या दृष्टिपथात आला पण तशाहि परिस्थितीत त्याने आपल्या तडफदार



अमरसिंग.

गोलदाजीने मोठमोठ्या फलदाजाना पेचात आणले थोरले वधु व हिंदु सघाचे प्रमुख तीव्र गोलदाज रामजी याच्या पुरस्काराने अमरसिंगाचा वरिष्ठ खेळात नतर प्रवेश झाला व १९३२ मध्ये, विलायतेत धाडलेल्या भारतीय सघात त्याचा एकदम अतर्भाव झाला या व १९३६ च्या सफरीत, त्यानी टेस्टमध्ये गोलदाजीत उत्तम व फलदाजीत बऱ्यापैकी कामगिरी केली उच व मजबूत शरीर, लवचीक मनगट व चपळ पाय लाभल्याने, त्याला चारपाच पावलातच चेडू वेगाने फेकता येई, व त्याचा अदाज नीट न आल्याने फलदाज

अत्यंत प्रबळ इंग्रजांच्या १३२ सात बाद अशी आणीबाणीची वेळ आली होती पुढे इंग्रजांनी बाजू सावरली हे वेगळे पण अमरसिंग व निसार या जोडीच्या माऱ्याने इंग्रजांची प्रथम तरी गाळण उडाली होती फलंदाजीतहि त्याने अशीच चमक दाखविली होती

## विजय मर्चंट

आघाडीचे व उपयुक्त फलंदाज म्हणून ज्यांनी जागतिक क्रिकेटमध्ये कीर्ति मिळविली त्यांत मर्चंट यांना पुष्कळ वरचे स्थान द्यावे लागेल, इतकी उच्च दर्जाची कामगिरी भारतात व इंग्लंडमध्ये त्यांच्या हातून झाली आहे. १९३६ साली भारताकडून टेस्ट सामन्यात मॅंचेस्टर येथे मर्चंट व मुस्ताक ही जोडी आघाडीवर गाजली व तिने जी २०३ धावांची भागीदारी केली, तीत मर्चंटचा वाटा ११४ धावांचा होता त्या सालच्या सफरीत त्यांच्या १७४५ धावा झाल्या व सरासरी ५१ पडली उंचीत मर्चंट इतर प्रमुख फलंदाजापेक्षा कमी असले तरी, उत्कृष्ट पदविन्यास ( फूटवर्क ), शांत स्वभाव व तीक्ष्ण नजरेमुळे ते ती उणीव भरून काढतात आघाडी सभाळून, बाजू बळकट करताना, त्यांना नेहमीच धिमेपणाने व संयमाने खेळावे लागे व अनेक अवघड चेंडू सोडावे लागत त्याबद्दल क्वचित् टीकाहि होत असे पण


विजय मर्चंट

ते संघाकरिता झटत असल्याने टीका सोसूनहि त्यानी आपला संयपणा कधी सोडला नाही, व आपल्या पक्षाला अनेक विजय मिळवून दिले १९४६ च्या त्याच्या दुसऱ्या विलायतच्या सफरीत त्यानी सात वैयक्तिक शतके (त्यातली दोन द्विशतके) एकूण धावा २३८५ व सरासरी ७४ ५३ इतकी कौतुकास्पद कामगिरी केली रणजी करडक सामन्यात त्यानी अनेक शतकं काढली, पण त्यात विशेष उल्लेखनीय म्हणज महाराष्ट्राविरुद्ध १९४० साली पुण्यात केलेले १०९ धावाचे होत कारण महाराष्ट्राच्या ६७५ धावाच्या प्रचड सटावर त्याना हल्ला करावा लागला होता त्याहीपेक्षा जास्त पराक्रम १९४३ साली, पुन्हाहि महाराष्ट्राविरुद्ध पण या वेळी मुबईत, त्यानी केला व रणजी सामन्यातला हझाऱ्याचा ३१६ धावाचा उच्चाक, मर्चटनी ३५९ धावा करून उल्लघून टाकला याहि वेळी मुबईची बाजू पाच बाद, ९० धावा, अशी घसरली होती, ती मर्चंटनी सावरून दणदणीत विजय मिळविला

१९४७ मध्ये, जो भारताचा सघ ऑस्ट्रेलियन स्वारीवर धाडण्यात आला, त्याचे नेतृत्व मर्चंटकडे देण्याचे ठरले होते पण आयत्या वळी प्रकृति बिघडल्याने, अधिकृत टेस्टच नेतृत्व त्याना कधीच लाभल नाही हे एक प्रकारचे दुर्दैव होय १९४६ च्या विलायतच्या सफरीकरिताहि कर्णधार म्हणून त्याची निवड होण सर्व दृष्टीनी योग्य व इष्ट होते पण बार्डातील नेहमीच्या कारवायामुळ मर्चट याचा तो हक्क हिरावून घेतला गेला तरीसुद्धा मर्चंटनी संघाशी पूर्ण सहकार केला यात त्याची शिस्त, निःस्वार्थी बुद्धि व खेळाडू वृत्ति पूर्णपणे दिसून आली याच गुणामुळे, वयाची चाळिशी उलटल्याबरोबर ते वरिष्ठ खेळातून व स्पर्धेतून स्वयस्फूर्तीने निवृत्त झाल

दणकेबाज व दिखाऊ टोलेबाजीकड मर्चंटची स्वाभाविक प्रवृत्ति नव्हती, पण आपला खेळ शास्त्रोक्त, कलापूर्ण व नियमबद्ध व्हावा अशी त्याची नेहमीची दक्षता असे व म्हणून भरमसाट खेळून व प्रेक्षकाना खूष करून त्यानी आपला बळी नाहक दिल्याच कधीच घडल नाही त्यानी खेळाच्या सर्व बाजूचा इतका अभ्यास केला आहे, की त्याना क्रिकेटच

अद्ययावत् ज्ञान असलेले दिसेल 'खेळाचा खरा विद्यार्थी' अशी पदवी त्यांना जास्त शोभून दिसेल

मर्चंटच्या फलंदाजीचा विशेष म्हणजे त्यांनी आकर्षक व सहजसाध्य लेटकट्. चेंडू कितीहि वेगात असला, तरी ते बॅटीच्या नुसत्या स्पर्शाने त्याला इच्छित दिशा दाखवू शकत 'ड्राइव्ह व हुक्वर'हि त्यांचे प्रभुत्व आहे पण त्यांच्या खेळातील खरे कौशल्य, गुगलीसारखे अत्यंत अवघड चेंडू, बरोबर हेरून, एक पाय पुढे टाकून बिनचूक अडवण्यात दिसून येई चेंडू साधा व सरळ कोणता व फिरकी व घातक कोणता हे ते बरोबर ओळखीत व या बिनचूक अंदाजामुळेच त्यांना धावांचे प्रचंड किल्ले उभारता आले

## विजय हजारे

जगांत अष्टपैलू (ऑलराउंडर्स) म्हणून विजय हजारे यांचे स्थान फार उच्च आहे १९३४ साली महाराष्ट्र संघातून त्यांनी रणजी सामन्यांत प्रवेश केला व आपले गुण पटवून दिले प्रथमतः मध्यम वेगाच्या परंतु अचूक व उपयुक्त गोलंदाजीने ते तज्ज्ञांच्या नजरेत भरले, परंतु नंतर यांनी फलंदाजीतहि प्रगति केली व त्या शाखेत काही संस्मरणीय विक्रम प्रस्थापित केले युद्धोत्तर कालात जर एखादा जागतिक संघ

हझाऱ्यानी 'रेस्ट' संघाकडून २४८ वैयक्तिक धावा केल्या लगेच हिंदूतर्फे मर्चंटनी २५० करून त्याला उत्तर दिले पण त्याच वर्षी अखेरच्या हिंदु विरुद्ध रेस्ट सामन्यात, रेस्टकडून हझाऱ्यानी, अभूतपूर्व पराक्रम करून ३०९ धावांचा, पचरंगी दंगलीत उच्चांक केला रेस्ट संघाच्या ज्या एकूण ३८७ धावा झाल्या, त्यात एकट्या हझाऱ्याच्या ३०९ होत्या, यावरून त्यानी संघाचा गोवर्धन पर्वत कसा उचलून धरला होता हे स्पष्ट होईल त्यानी



विजय हझारे

यरहि विपरीत परिणाम झाला व त्याच्या प्रकृतीला व खेळाला वयाच्या चाळिशीच्या सुमारास उतरती कळा लागली, व १९५३ पासून ते टेस्ट क्रिकेटमधून जवळजवळ निवृत्त झाल्यासारखेच आहेत

त्याच्या मनाची ठेवण विजय मर्चंटसारखीच म्हणजे कोणतीहि गोष्ट अभ्यासू वृत्तीने व तन्मयतेने करण्याची असल्याने, आपल्या संघाला आपला उपयोग जास्त कसा होईल यावर याच लक्ष असे, व म्हणून त्यानी आपल्या पक्षाला अनेक विजय स्वपराक्रमाने मिळवून दिले, असे सामन्यातील आकड्यावरूनहि दिसेल त्याच्या फलंदाजीत सर्वांगीण गुण असल, तरी ऑन ड्राइव्ह व कव्हर ड्राइव्हमध्ये त्याचे निपुणत्व विशेष दिसून येते दण-दणीत व उडून येणाऱ्या तीव्र गोलदाजीला जरी ते धाडसाने चोपू शकत नसले तरी कमच्या, मद व मध्यम वेगाच्या कसल्याहि गोलदाजीला ते कधीहि दाद देत नसत ज्याना खेळात प्रक्षोभक व आकर्षक टोलेबाजी व पट्कारांची खैरात हवी असेल त्याना हझाऱ्याचा खेळ कटाळवाणा वाटेल पण ज्याना खेळातील मर्मस्थाने व खाचाखोचा कळतात, व स्पर्धेत जबाबदारीची जाणीव असते, त्याना हझाऱ्याच्या शास्त्रोक्त व उपयुक्त खेळाचे कौतुक केल्याशिवाय राहवणार नाही

**विनू मानकड**



विनू मानकड

डावखोरी गोलंदाजी इतक
परिणामकारक ठरली की
'भारताचा व्हेरिटी' अशी
पदवी तज्ञांनी स्वयस्फूर्तीने
त्याला दिली १९५२ मध्ये
विलायतेतील लॉर्डस मैदाना
वर बेडसर व ट्रूमनसार
ख्यांच्या वेगाच्या माऱ्याल
बिलकुल दाद न देता
भारताचा डाव घसरत जात
असतानाहि स्वतःच्या १८४
धावा करून त्याने सर्वांची
वाहवा मिळविली त्याचा
यापुढील पराक्रम १९५६
थजर दिसून आला त्याने
त्या साली वरिष्ठ सामन्यात
ंभर बळकेटम व हजार

एकदम हल्ल्याला सुरवात करतो. हल्यला हेंच बचावाचे मुख्य साधन आहे, असा त्याचा प्रघात आहे. लेगपुल व ऑफ ड्राइव्ह या टोल्यांवर त्याची जास्त भिस्त असते. त्याचा खेळ मंद व कंटाळवाणा कधीच होत नाही. सावधपणापेक्षा साहस हेंच त्याचें ब्रीद आहे. १९५४–५५ सालच्या पाकिस्तान मोहिमेचें नेतृत्व त्याच्याकडे सोपवून, भारतीय क्रिकेट संस्थेने त्याचा योग्य गौरव केला असे म्हणणें प्राप्त आहे.

